# वैद्य दप्तरांतून निवडलेले कागद

## खंड २

## सन १७४०

संपादक—
**शंकर लक्ष्मण वैद्य,**
३७६ बुधवार पेठ, राममंदीर पुणें.

शके १८७०



**किंमत तीन रुपये.**

# अनुक्रमणिका

| विषयाचे नांव | | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | पुरस्कार | १ |
| २ | प्रस्तावना | १ ते १५ |
| २ | ऐतिहासिक प्रकाशनासंबंधीं अडचणी | १ ते ६ |
| ३ | ऐतिहासिक पत्रें | १ ते ९५ |
| ४ | सूचि | |
| | व्यक्तिसूची | |
| | स्थलसूची | |

मुद्रक–अनंत कृष्ण कुलकर्णी, आनन्द प्रिंटिंग प्रेस, १८२ सोमवार पेठ, सातारा.
प्रकाशक–शंकर लक्ष्मण वैद्य, ३७६ बुधवार पेठ पुणे

# पुरस्कार १७४०

'**वैद्यदप्तरांतून निघडलेले कागद**' खड २ रा हा प्रसिद्ध होत असलेला पाहून मडळाला फार समाधान वाटत आहे. खड ३ रा हाही याबरोबरच निघत आहे यामुळे समाधानात आणखी भर. श्री शंकरराव वैद्य यांनी आपल्या घराण्याचे कागद मोठ्या कष्टाने आणि साक्षेपाने जमवून त्याच रीतीने ते सर्व लावले व प्रसिद्धीसाठी तयार करून ठेवले, याबद्दल त्याचे घराणे ऋणी राहीलच पण महाराष्ट्रानेहि राहिले पाहिजे पाऊणशेच्या घरात व त्यातून प्रकृतिमान व मनःस्वास्थ्य बेताचेच, असे असूनही दादासाहेब वैद्यानी एवढा खटाटोप कशासाठी केला व उरलेले आयुष्य पूर्ण विश्रांतीत का घालवीत नाहीत याचा सुविद्य विचारी जनतेने काळजीपूर्वक अभ्यास केला पाहिजे व त्याचे कार्य नीट रीतीने कसे पुढे चालू राहील याचीहि चिंता वाहिली पाहिजे असो आम्ही प्रथम श्री शकररावजीचे अभिनदन करून हा लहानसा पुरस्कार सादर करतो.

या खडांत एकदर ९४ पत्रे प्रसिद्ध केली आहेत. त्यापैकी पहिली १२ सोडून बाकीची सन १७४० मधली आहेत. श्री वैद्यानी त्याचे प्रस्तावनेत चागले वर्गीकरण केलेच आहे बहुतेक पत्रे हिशेबाची व घरगुती व्यवहाराची आढळली तरी तीत कित्येक तरी तथ्य आहे. शिवकालीन हणमते घराणे, आरिसाचे सुभेदार शिवभट साठे याचे घराणे, बाबूजी नाइकाचे घराणे यासारख्या इतिहासप्रसिद्ध घराण्याविषयी, घोम बाणेरे, मेडद कासारी वगैरे स्थळाविषयी, तसेच कर्नाटकाच्या चदासाहेबाची कैद, गोवळकोटची लढाई यासारख्या महत्वाच्या घटना याची नवीनच माहिती प्रस्तुत खंडावरुन मिळणार आहे सराफाना व अर्थशास्त्रज्ञाना जुन्या सराफी व्यवहाराची चागली ओळख होईल. 'शनवार तेली' व 'सोमवार तेली' या तेल्याच्या पोटजाती आहेत पेठाशी त्याचा काही सबध नाही. बेने- इस्राएल शनिवारी धार्मिक कारणासाठी घाणा बद ठेवतात म्हणून त्याना 'शनवार तेली' म्हणतात, व तिळवण तेली किंवा मराठे तेली सोमवारी घाणा बद ठेवतात म्हणून त्याना 'सोमवार तेली' असे नाव पडले आहे

ऐतिहासिक पत्राचे प्रकाशनासबधी अडचणी हा मडळात वाचलेला लेख उद्बोधक आहे. खडाच्या प्रस्तावना वाचनीय आहेत

श्री शकरराव याना पुढचे खड सपादण्यास दीर्घायुरारोग्य लाभो व असेच पुरस्कार लिहिण्याचे योग मडळास येवोत अशी सशोधनेश्वराजवळ प्रार्थना आहे.

श्रावण शु॥ ८ }
शके १८७० }

चिंतामण गणेश कर्वे
चिटणीस
भा. इ. स. मंडळ.

# खंड २ ची प्रस्तावना

मानवानी आपल्या आयुष्यातील प्रत्येक क्षण निरर्थक न दवडता तो कारणी लावावा असा अर्थ ज्यांत अभिप्रेत आहे असा कवी वामन पंडित याचा ॥ काळ चोर घिरट्या बहु घाली। पामरा तुज वशी निज आली॥ जाग जाग स्वरूपी लवलाहृया। जातसे वय अमोलिक वाया॥ हा श्लोक वारवार मनात येऊन माझें उतार वयातही वैद्य दफ्तरातील निवडलेल्या जुन्या ऐतिहासिक कागदाचा हा दुसरा खंड परमेश्वर कृपेने बाहेर पडत आहे पहिल्या बाजिरावांच्या कारकीर्दी अखेरचे निवडलेले कागद खड पहिला व त्याची पुरवणी अशा दोन पुस्तकात छापलेले आहेत, दफतरातील कागद निवडण्याचे काम बहुतेक ब्रिटिश अमदानीतच केल्यामुळे कागदाचे खड इसवी सन सालाप्रमाणेच करणे सोईचे वाटले. शालिवाहन शक किंवा राजशक या प्रमाणे करावे असे मनात आले नाही, असे नाही; पण कोणत्याही कागदाला इसवी–सनाप्रमाणे ही तारीख देणे भाग होते. कारण ऐतिहासिक सदर्भग्रथ इसवी सन देऊनच लिहिलेले आहेत. तीनही शकाचा प्रारभकाल एक नसल्यामुळे कोणत्याही शकाच्या खडात २ दुसऱ्या शकाचा समावेश करावा लागतो. एका इसवी सनात जाने–वारी ते डिसेबर अखेर २ फसली शक, २ शालिवाहन शक किंवा २ राजशक येतात. फसली शक अदमासे मे किंवा जून महिन्यात असतो. तो मृगाला सुरू होतो. शालिवाहनाचा चैत्र अदमासे एप्रिलमध्ये येऊन, फाल्गून मास मार्चमध्ये येतो. राजशक साधारणपणे मे किंवा जूनमध्ये येतो. फसली व राजशक ह्याचे प्रारभ कालात फारसा फरक नसतो. इग्रज सरकारने मुलकी साल मार्चअखेर सपवून, वर्षारभ एप्रिलमध्ये ठेवला होता. आपल्या शालिवाहन शकास अनुसरून असे केले असावे असे वाटते. आता ब्रिटिश आमदानी सपुष्टात आल्यामुळे आपल्या शकाप्रमाणे कागद लावावे असे मनात आले. पण मला वेळ नसल्यामुळे तसे करणे शक्य दिसेना. म्हणून खडाची वाटणी इसवी सन सालाप्रमाणे केलेली कायम करणे भाग पडले पुढील खडाचा पुरवणी खड न काढता पूर्वीच्या कालातील कागद खडाच्या प्रारभी देण्याचा विचार केला आहे. कमी महत्त्वाचे कागद दप्तरात आहेत, ते पाहून कोणास छापावेसे वाटल्यास माझी हरकत नाही. प्रत्येक पत्रावर मिती व तारीख [illegible] आहे.

ऐतिहासिक कागद म्हणजे केवळ लढाईची किंवा राज्यक्रात्याची वर्णने नसून [illegible] सामान्यतः कोणकोणत्या विषयाचा समावेश करावा लागतो हे कै. न्या. रानडे [illegible] रा. ब. वाड याच्या पेशव्याच्या रोजनिशाना जी प्रस्तावना लिहिली आहे, त्यात दिले आहे. त्यातील विषयाचा तपशील माझ्या "ऐतिहासिक पत्राचे प्रकाशनासबधी अडचणी" ह्या निबधात परिच्छेद ९ मध्ये दिला आहे. ज्याच्या कर्तबगारीने मराठी राज्य इतके दिवस टिकून राहिले होते, त्याच्या पत्रांना मी विशेष महत्व दिले आहे. सन १८१८ नतर इग्रजी आमदानीत त्याच्या घराण्याचा मागमूस होता, पण त्यास महत्व मुळीच ठेवले

नव्हते. आपले बूड कायम करण्या पुरताच त्याचा उपयोग इंग्रजानी करून घेतला, असें म्हणणें गैरवाजवी नाही. यात सस्थानिक व सरजामदार व सरदार याचा समावेश होतो. हिंदु कायद्याप्रमाणे जिनगीच्या वाटण्या घराण्यापैकी कोणीहि मृत मनुष्य झाला तर वारसा हक्काप्रमाणे होतात. वाटण्या एक पैपर्यंत झाल्यामुळे कित्येक कर्तबगार घराणी दारिद्र्यावस्थेस जाऊन धुळीस मिळाली आहेत त्यातील हयात पुरुषाना आपल्या पूर्वजाच्या पराक्रमाची व योग्यतेची कल्पना कितपत आहे याची शका येते. हल्ली कांही घराण्याचे इतिहास छापलेले असून काहीचे छापण्यात येत आहेत, यामुळे त्या घराण्यांतील पुरुषाच्या कर्तबगारीची व पराक्रमाची माहिती घेण्यास मार्ग झाला आहे. सस्थानिक किंवा सरजामदार याचा वारसा, हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे न ठरवितां तो ठरविण्याचे इंग्रजांनी आपल्या मर्जीवर ठेवले होते.

वैद्य घराण्याचा सबध किती निरनिराळ्या घराण्याशी होता हे दाखविण्याचा प्रयत्न करताना त्याच्या सपर्काचाहि उल्लेख करावा लागला आहे, परन्तु अशा घराण्याना कर्ज देण्यात वैद्याचा काय उद्देश होता, याचा विचार केला असतां, मराठी राज्याच्या स्थापनेसाठी वैद्यानी केलेला स्वार्थत्यागही दिसून आल्या खेरीज राहात नाही. त्यांनी मोठमोठ्या सरदाराना पैसे पुरविलेच; पण त्या बरोबरच त्यांनी त्याचा आपल्यावरील विश्वासही इतका वाढविला की, कोणत्याही राजकीय बाबतीत सरदार–सरजामदार त्याचा सल्ला घेतल्याखेरीज रहात नसत. **छत्रपती, पेशवे, आंग्रे, भोसले, सचीव, प्रतिनिधी, हणमंते,** आमात्य व इतर सरदार याना **वैद्य हेच** योग्य सल्लागार वाटत असत, असे त्याची पत्रे वाचली असता दिसून येते. सावकारी पेशापेक्षा त्याच्या सल्लागारीसच विशेषेकरून महत्व देण्यात येत असे, म्हणून त्याना कोणी ‘ नाईक ’ म्हणत नसत.

या खडातील कागदाचे वर्गीकरण विषयाचे व व्यक्तीचे महत्व लक्षात घेऊन केले आहे व त्यास अनुसरून प्रस्तावनेत त्याची माहिती देऊन ती लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. ही प्रस्तावना वाचल्याखेरीज कागदाचे महत्व कळणार नाही. म्हणून वाचकानी कागद वाचण्यापूर्वी प्रस्तावना वाचावी, अशी विनति आहे. केवळ कागदाचेच वाचन केल्यास ते नीरस व व्यर्थ होईल म्हणून ही सूचना केली आहे. विषय व व्यक्ती याच्या संबधाचे जे कागद आहेत. त्याचे नबर प्रस्तावनेत एकत्र दिले असल्याने ते कागद त्या नबराच्या क्रमाने वाचले असतां विषय व व्यक्ती याच्याबद्दल माहिती होण्यास अडचण पडणार नाही.

**वर्गीकरण**–१ सनदा व आज्ञापत्रे. २पत्रे (अ) वैद्यास आलेली (ब) वैद्यानी लिहिलेली (क) इतरानी एकमेकास लिहिलेली. ३ हिशेब. ४ पावत्या. ५ याद्याः– कापडाच्या, दागिन्याच्या, कर्जदाराच्या वगैरे. ६ लढाया. ७ देवालये व धार्मिक कृत्ये. ८ वैद्याचे मुक्काम. ९ महत्वाची कर्तबगार माणसेः– छत्रपती, अष्टप्रधान, सरदार, सरजामदार, मुत्सद्दी, इनामदार, वतनदार, सल्लागार, सुभेदार, कारकून, वकील वगैरे.

**१ सनदा व आज्ञापत्रेंः**—सनद याचा अर्थ ‘अधिकारपत्र’ किंवा ‘ देहेनगीपत्र ’ या शब्दांनी जरी होत असला तरी तो त्याहीपेक्षां व्यापक असल्याने त्याचे स्पष्टीकरण

करणें जरूर असून इष्टही आहे. छत्रपती शिवाजी महाराजाना अष्टप्रधान नेमावे लागले, याचे कारण पाहूं गेलें असता असे दिसून येते की, राज्यकारभार चालविण्यास लागणाऱ्या मनुष्यबलाची व ज्ञानबलाची त्यानी योग्य तजवीज केली आहे कोणाला लढाईचें, तर कोणास फडणविशीचे, कोणाला न्यायाचे, तर कोणास चिटणिशीचे अगर मुजुमदारीचे वगैरे कामे करतां येतील हे पाहून योग्य मनुष्यांची निवड केली आहे व अंगी असलेले बुद्धिचातुर्य दाखविण्यासाठी राष्ट्रोपयोगीं कामे करण्यास वाव देऊन त्या त्या कामाची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली. कोणास गावाचे उत्पन्न इनाम करून दिले, व कोणास खजिन्यातून नक्त नेमणूक करून दिली. काही बाबतीत धार्मिक बुद्धीनेही देवस्थानास किंवा ब्राम्हणास काही गावे व जमिनी इनाम करून दिलेल्या आहेत. या सबधाने जी पत्रे त्यांनी करून दिली त्यासच 'इनाम पत्र' हे नाव आहे. काही इनामे राज्यांतील कामे, हुकुम होतील त्याप्रमाणे करण्यास तयार राहाण्यासाठी व काही लोकांस राज्यकारभाराची जबाबदारी पार पाडण्यासाठी वतने दिली आहेत. य त इनामदार, सरंजामदार व वतनदार याचा समावेश होतो. कामगिरी करून यजमानास खूष करणाऱ्या काही लोकांस सबद गांवे दिल्याचे व काहीना फक्त जमिनी दिल्याचे आढळून येते. अशा इनामदाराना इनामाबद्दल सरकारची नोकरी करावयाची नसते. सरजामदार व वतनदार याना नोकरी करावी लागते, म्हणून त्याना दिलेल्या देणग्या सरकारच्या मर्जीवर चालू राहातात दोघानाही राजनिष्ठ राहाणे जरूर असते. आता वतने कम्यूट म्हणजे खालसा झाली आहेत. वतनदारास काही प्रमाणात नक्त नेमणूक देतात.

'आज्ञापत्रें' ही महाजांनीच सनदांची अमलबजावणी करण्याकरिता काढलेली पत्रेंअसतात. 'आज्ञापत्र' ही खरी सनद नव्हे. ज्यास इनाम देणगी द्यावयाची त्यांच्या नावे छत्रपतींनीं लिहून दिलेले जे पत्र ती मूळ 'सनद' होय. तिची व आज्ञापत्राची भाषा थोडी निराळी असते ज्यास इनामपत्र द्यावयाचे त्याच्या मूळ सनदेत 'मोकासा इनाम दिला असे' या वाक्यापुढे पुढील मजकूर असतो 'तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहणे.' व शेवटी 'पाा हुजूर मोर्तब असे' ही वाक्ये असतात. आज्ञापत्रांत पुढील निराळा मजकूर अमलबजावणी कामगारास लिहिलेला असतो 'तर तुम्ही मौजे मजकुरास ताकीद करून यास व याच्या पुत्रपौत्रादि वशपरंपरेने याजकडे इनाम चालवणे, या पत्राची नकल करून घेऊन हे पत्र भोगवटयास, त्यास परतोन देणे. जाणीजे.' व शेवटी तारीख देऊन 'पाा हुजूर' लिहिलेले असते. अधिकाऱ्यास आज्ञापत्रे काढताना वर्तमान व भावी कारकून (लेखक) यांचाही समावेश केलेला असतो. म्हणून अशी सनद 'यावच्चद्र दिवाकरो' आहे असे म्हणावे लागेल. धुळ्याचे रा. भास्कर वामन भट यांनी "महाराष्ट्रातील ऐतिहासिक पुरुषाच्या मुद्रांचें प्रदर्शन" असा लेख 'इतिहास व ऐतिहासिक' मासिकातन २८ ते ३१ च्या जोड अकात लिहिला आहे. त्यातील या सबधाच्या मजकुराने माझ्या वरील मतासच पुष्टी मिळते शिक्का व मोर्तब यात श्रीकाराच्या एका बाजूस चद्र व दुसरे बाजूस सूर्य हेच दर्शवितात. ही आज्ञापत्राची भाषा फार व्यापक आहे. गावचे पाटील कुलकर्णी, देशमूख, देशपांडे यास ही आज्ञापत्रे याच मजकुराची काढलेली असतात. कांही आज्ञापत्रांत 'नूतन पत्राचा प्रतिवर्षी आक्षेप न करणे' असाही मजकूर असतो.

सनदा व आज्ञापत्रें यांना 'राजपत्रें' म्हणत, असे दफतरांतील सनदांच्या फेरिस्तांच्या कागदातील यादीवरून दिसते. ही राजपत्रे निरनिराळ्या अमलदाराच्या कचेरीतून तयार होत. मुख्य सनद व मुकदमाचे आज्ञापत्र फडनिशी कचेरीतूब व बाकीची राजपत्रे चिटणिशी कचेरीतून निघत. फडणिसाकडे वसुलाचे काम असल्या-मुळें त्याचेकडून वसुलाशी सबध असणारी फक्त ही दोन राजपत्रे तयार होत असत, असे दिसते.

सनदा संबधी पुष्कळ लिहिण्यासारखे आहे. यासंबधाने जास्त माहिती विशिष्ठ सनदा सबधी लिहिताना वेळोवेळी दिली जाईल. सनदा अष्टप्रधानापैकी कोण व कशा लिहितात या बद्दलची माहिती, व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचे विद्यमाने कै. दत्तोपंत पारसनीस 'भारत वर्ष' नावाचे मासिक काढीत असत, त्यातील पुस्तक २ अंक २ मध्ये 'मराठी दफतर' म्हणून एक प्रकरण आहे, त्यात सविस्तर दिली आहे. ती वाचकांनी जरूर वाचावी.

भास्करभट वैद्यांना कोकणांत नरवण, कासारी वैद्यलागवन वाटद, रीळ व साडेलागवन या ठिकाणी इनाम जमिनी दिलेल्या होत्या ब्रिटिश अमल सुरू झाल्यावर सनदेत लिहिलेल्या जमिनी निश्चित करणे कठिणझाल्यामुळेइग्रज सरकाराने त्या जमिनीच्या उत्पन्नाइतकी नक्त नेमणूक त्याच्या वारसास खजिन्यातून देण्याचे ठरविले. यासच 'इतलाख इनाम' म्हणतात. ही नेमणूक अजून वैद्य घराण्याच्या एका शाखेकडे चालू आहे.

कोर्टदरबारांत सनदा व आज्ञापत्रे यात भेद करीत नाहीत, सर्वच सनदा समजतात. शाहूमहाराजांच्या आज्ञापत्राच्या शेवटी 'लेखनालकार' असा शब्द असून त्यापुढे मोर्तब (समाप्तिमुद्रा) असते सनदापत्रावर महाराजांची स्वाक्षरी नसते. प्रारभी प्रतिनिधी व पंत प्रधान याचे शिक्के असून शेवटी जो मोर्तब असतो त्यांत 'मोर्तबसुद' अशी अक्षरे असतात आणि त्याच्याखाली 'रुजू सुरू निवीस' 'समत सुमत' 'समत मत्री' 'समत सरकार' असे लिहून बाजूस फसली सालाची मिती दिलेली असते आणि याच्याही खाली 'बारसुद' 'सुरू सुद' 'बार' 'बार' 'बार' असे लिहिलेले असते. सरकारच्या कोणत्याही सनदेवर सचिवांची 'रुजू सुरूनिवीस' व 'सुरु सुदबार' ही अक्षरे असावयाची. (भिडेकृत 'अष्टप्रधानाचा इतिहास' पान ३०३ पहा.) 'राजाज्ञा' हे पद नवीनच राजारामाच्या कारकीर्दीत निर्माण झाले. तेव्हांपासून 'समत सरकार' असे सनदापत्रावर लिहू लागले 'तेरीख' व 'बार' हे फडणीस लिहीत व याखाली ४ वेळा लिहिलेला 'बार' हा शब्द चौथा अष्ट-प्रधानांचा असावा असे वाटते. त्याच्या कचेरीत या सनदाची बारनिशी होत असावी. 'सुरुनिवीस' म्हणजे 'सचीव' याच्यामागे 'रुजू' शब्द का व 'सुमत' 'सरकार' व 'मंत्री' याच्यामागे 'समत' शब्द का याचे कारण समजत नाही. 'रुजू' व 'समत' याचा अर्थ एकच असावा असे वाटते.

आज्ञापत्रांत 'मुकदम' शब्दाऐवजी 'मुकदमानी' असा शब्द येतो. तो महाराष्ट्र कोशांत मुकदमाचे अनेकवचन असे दिले आहे. पण मला तो शब्द एकवचनीच वाटतो. रा. शंकरराव जोशी (इतिहास संशोधक) यानी शिवकालीन वतनदाराबद्दल लेख लिहिला आहे त्यात या शब्दाचे निरनिराळे अर्थ दिले आहेत, पण गावातील वतनदार 'मुकादम' कोण हे त्यावरून निश्चित होत नाही. ब्रिटिश अमल सुरू झाल्यावर जी वतनदारांची यादी तयार झाली आहे, त्यात 'मुकादम' दिलेला नाही पण आमच्या कागदात १८१९ सालच्या बावधन ता. वाई येथील पाटील किंवा कुलकर्णी याच्या नावें सरकारी पत्र न लिहिता मुकादमास लिहिलेले आहे हा गावचा अधिकारी केव्हा कमी झाला, हे कळत नाही. माझ्या कागदात मुकादमाला लिहिलेली सनदेसबंधी आज्ञापत्रें पुष्कळ आहेत व काही मुकादमास याद्या लिहिलेल्या नानासाहेब पेशवे याच्या कारकीर्दीतील आहेत. त्यात पाटील व कुलकर्णी यास पाठवून द्यावे असा मजकूर मोकदमास लिहिला आहे. खंड १ पत्र नं १२ मध्ये छत्रपतींनी कासारी गावची जमीन वैद्याकडे चालविण्यासाठी जे आज्ञापत्र काढले आहे ते तारीख १७-११-२६ चे असून त्यात 'मोकदमानी' असा शब्द आहे बाबूजी नाईक बारामतीकर याचे पूर्वज कृष्णाजी ना। बिन केशव ना। जोशी यास पिंपरी गावची इनामाची सनद सन १७२४ मध्यें मिळाली. त्याबद्दल बाजीराव पेशवे यानी मोकदमास जे आज्ञापत्र काढले आहे त्यात 'मोकदमानी' असा शब्द वापरला आहे. सन १७४४ मधील काही थोड्या पत्रात 'मोकदम' असाच शब्द आढळतो. यावरून 'मोकदम' व 'मोकदमानी' या दोन्ही शब्दाचे अर्थांत फरक नाही हे उघड आहे. 'पाटील' व 'कुलकर्णी' या व्यतिरिक्त पूर्वी 'मुकादम' हा गावचा वतनदार होता असे म्हणावे लागते 'मुकादमानी' हा निरनिराळ्या वतनदारातील मुख्य, असा अर्थ कोणी करतात. पण कोठे तितक्या वतनदाराना निरनिराळी आज्ञापत्रे काढलेली दिसून येत नाहीत. याबद्दल जास्त संशोधन होणे जरूर आहे.

सनदेवरील किंवा आज्ञापत्रावरील शिक्के किंवा मोर्तब याच्या मजकुरातील भाषा अशुद्ध असते. हा कारागिराचा दोष आहे. अधिकारी माणसाचे भाषाज्ञान कमी होते असें अनुमान काढणे चुकीचे होईल.

महाराजांचे अक्षर राजपत्रावर जरी नसले तरी त्यानी सनदेशिवाय इतर खाजगी मजकुराची किंवा हुकूमवजा जी पत्रे लिहिलेली आहेत त्यावर पत्राच्या शेवटी त्याचे अक्षर दिसून येते. अक्षराचे वळण व भाषा पाहून त्याचे पत्र ठरविता येते. 'बहुत काय लिहिन' 'प्रमान देन' ही शब्दरचना त्यात दिसून येते. अशी जी पत्रे सापडली, त्यातील बरीच छापण्यासाठी निवडली आहेत.

पूर्वी जी पत्रे लिहिण्यांत येत असत, त्यावर लेखकाची सही नसे. श्रीकाराच्यापुढे घराण्याच्या पूज्य देवतेचे नाव, उदाहरणार्थ 'रामचद्र' 'भवानी' 'शकर' 'गजानन,' असे लिहावयाचे व पत्राच्या शेवटी 'बहुत काय लिहिणे हे विनती' असा किंवा यापेक्षां जास्त मजकूर त्याने स्वतः लिहावयाचा, अशी पद्धत सरसहा दिसून येते.

लेखकाच्या अक्षराच्या वळणावरून तें पत्र कोणी लिहिले हे ठरवितां येते. कांही पत्रें आरंभापासून शेवटपर्यंत लेखकाने स्वतः लिहिलेली आहेत. ' शाहू छत्रपतींच्या सनदापत्रातील विशेष ' असा निबंध भा. इ. सं. मंडळाच्या वार्षिक समेलनात तारीख २५-५-४६ रोजी मी वाचला होता. त्यातील काही मजकूर वर द्यावा लागला आहे.

न. ३० हें आज्ञापत्र बाणेरे गाव तिमाजी रघुनाथ हणमते यास इनाम दिलेला श्री देव चिंचवड याचे वहिवाटीस होता, तो राजाराम छत्रपतीनी भुजबलराव सेना सप्तहजारी याजकडे जरी दिला होता तरी तो काढून देवाकडे चालविण्याबद्दल रामचद्र नीळकंठ अमात्य यानी पुणे प्रांताचे सुभेदार नरहरी आपदेव यास ६-२-१६९९ रोजी काढले. जयसिगराव जाधव सेनापति यांनी त्याच आशयाचे आज्ञापत्र बाणेऱ्याच्या मोकदमास ता. १०-१२-१७०० रोजी काढले आहे. जयसिग हे धनाजीचेच नाव होतें. (न. ३१) जाधवरावाचा हुकुम अमलांत यावा म्हणून शकराजी नारायण सचीव यानी जाधवरावाचा दिवाण गोविंद हरी यास पत्र ता. २६-१२-१७०० चे लिहिले आहे. ( नं. ३२). चद्रसेन जाधव यानी म्हसाजी फडतरे यास ३०-१-१७०९ रोजी पत्र लिहून त्यात बाणेरे गावच्या वसुलास त्यानी हरकत करू नये म्हणून लिहिले आहे.

आपाजी सोमवंशी सरलस्कर यानी भिमथडीतालुक्यातील मेडत गावता. २७।८।४० रोजी वैद्यास इनाम करून दिला ( न. ६३ ) हा तालुका सोमवशीकडे महाराजांनीं सरजामी मुलुख म्हणून दिलेला होता. यामुळे त्यावर त्याची हुकमत होती. त्यानी १।१०।१७४९ रोजी हा गाव वैद्याकडून काढून घेऊन त्या ऐवजी त्यास ' बऱ्हाणपूर ' गांव दिला व त्या प्रमाणे त्या प्राताचे सुभेदार खंडो आपाजी व गावचे मोकदम यास त्यानी आज्ञापत्रे काढली आहेत ( न. ७१, ७७ ) इतक्या लवकर हा गाव हातचा जात असल्यामूळे आपला तोटा किती आहे हे वैद्यांचे कारकून व कमावीसदार धोंडो अनंत जोग व शिवराम तुकदेव करमरकर यानी यजमानास एका पत्रात सविस्तर कळविले आहे ( न ८० ) पत्र वाचनीय आहे. हे दोन्ही गाव सध्यां वैद्याकडे नाहीत. सोमवंशी सरलस्कर घराण्याची माहिती वैद्य दप्तर पुरवणी खंड १ च्या प्रस्तावनेत पान १०।११ मध्यें दिली आहे ही सरलस्करी शाहूमहाराजाचे मृत्यूनतर निंबाळकर घराण्याकडे गेली.

मेडद गाव वैद्याकडून परत घेतल्यावर पुढे बाबूजी नाा बारामतीकर जोशी यांजकडे तो गेला. त्यांच्या वंशजाच्या वाटणीमध्ये हा गांव ज्याकडे गेला त्यास 'मेडतकर' असे म्हणू लागले इंदापुराकडील 'बावडा' गांव ज्याकडे गेला त्यास 'बावडेकर' म्हणू लागले बारामतीची मिळकत जोशी घराकण्याडे आतां नाहीं त्यांच्या तेथील मव्य वाड्यात हल्ली मुन्सफ कोर्ट व मामलेदार कचेरी आहे. पुण्यांत शनिवार वाड्यापुढील जो मोठा वाडा मेडतकर व बावडेकरांचा समजला जातो, तो जोशांचाच आहे.

कासारी ता. रत्नागिरी हा गांव भास्करभट वैद्यानां महाराजांनीं १७२६ साली इनाम करून दिला. या गावची मोजणी धोंडो विश्वनाथ जोग व गोविंद हरी जोग

यानी केली, त्या गांवची लागवड १७४० साली अंताजीपंत गद्रे यांनी केली, पण राघोबा दरवे अर्धेल घेऊन गेले, ही हकीगत थोरात यांनी वैद्यांना कळविली आहे (नं. ४२). वैद्य हे तिकडून तादूळ बाई सातार्‍यांकडे आणीत, असे या पत्रावरून दिसतें या गावच्या वसुलासंबंधी हकीगत राघोबा दरवे यानी वैद्याना कळविली आहे (न. ९०). दरवे याच्या पत्राच्या शेवटी 'विनति लक्ष' असे लिहिलेले असते याचा अर्थही विचारणीय आहे.

पत्रें–(अ) त्रिवर्ग वैद्यबंधूना आलेली व त्यांनी दुसर्‍यांस लिहिलेली सुमारे १५।२० पत्रे आहेत. यात बाजिराव बल्लाळ याचे कार्कीर्दीतीलच ८।९ पत्रे आहेत. नं ५ च्या पत्राचा लेखक शंकराजी बलाळ हा कोण हे समजत नाही. हे पत्र माचा महिमतगडाहून लिहिले असून त्यांत तेथील सुभेदार कृष्णाजी वामन खरे, व यमाजी शिवदेव मुतालीक हे छत्रपतीचा अमल कसा झिटकारतात, याचे वर्णन कडक भाषेत आहे. कोकणचा मुलूख खरोखर अंग्र्यांचा. त्याच्या पेक्षा हेच लोक कसे डोईजड झाले आहेत त्यास नाळयावर आणण्यास काय करणे जरूर आहे हे लेखकाने सुचविले आहे. हा काल गोवलकोटच्या लढाईचा आहे. त्यावेळी भास्करभट वैद्यांच्या सागण्यावरून शंकराजी बलाळ महिमत गडास गेला होता. या पत्रात नवीन अपरिचित शब्द आहेत. पत्र न ६ हे विश्वनाथजोशी चिपळूणकरानीं नागपूराहून पाठविले आहे त्यात रघूजी भोसले यानी दिलेल्या रकमा लवकरच पाठवणे, असे लिहिले आहे. हा उल्लेख न. ५ मध्येंही आहे. हा वैद्याचा विश्वासूक कारकून असावा. न. ७ हे पत्र १७३८ मधील असून वैद्याचा कारकून शंकराजी कानो याने पाठविले आहे यांची पत्रें खड १ मध्ये असून त्याने वैद्यांना यात वसुलाची हकीगत लिहिली आहे. तो वर्‍हाड नागपूरकडे ही गेलेला आहे. महादाजी गदाधर आमात्याचा लासुर्णे गांव वैद्याकडे गहाण होता, त्याचे वसुलीसाठी हयाला पाठविण्यात आले होते. पत्रातील 'सनद' याचा अर्थ 'हुकूम' असा आहे. न ८ हे पत्र कृष्णाजी तानदेव साठे यानी भास्करभट वैद्यास लिहिले आहे. त्यांतील मजकूर विशेष महत्वाचा नाही पण बुरबाडचा हा राहणारा असून वैद्याचा तेथील जोशाकडे नात्याचा सबध होता. यामुळे वैद्य कोकणांत गेले म्हणजे तेथे जात. साठे कुलवृत्तात व सरदेसाई कुल वृत्तात यात या गावाबद्दल माहिती आहे. साठे हे तेथील महाजन होत. वाईचे धर्मपुरींतील साठे हे जरी सुसेरीचे आहेत. तरी त्याचा मूळपुरूष कृष्णाजी तानभट बुरबाडचा होता (साठे कुल वृत्तात पान ११४व११८) शिवभट साठे याच कुलांतील असावा. २५।१०।१७६४ च्या हिशेबाच्या कागदांत शिवभटाबद्दल सूचक माहिती आहे. त्यातच मुकुंद तानदेवाचा उल्लेख आहे. तो कृष्णाजी तानदेवाचा भाऊ असावा. नं.१२।१३।१५ची पत्रे कृष्णाजी हरी साठे यांनी लिहिली असून त्यात रामचंद्र गोपाळ शेणवी, हरभट केळकर, बाबुराव कोनेर कोलटकर, शंकरभट (?), नानाजी ना। जोशी, महादाजी ना। निंबाळकर यांजकडील पैसे वसूल, होत नसून केसोपंत वैद्य हे रू. २५००० मागतात, त्याची तजवीज सदाशिव ना। रास्ते याचे कडून आलेले ७००० देऊन आपण बाकीचे भरतीस घालीत असाल तर द्यावे, असे सुचविले आहे.

केसोपंत हा बहिरभट वैद्याचा मुलगा, विश्वनाथ भटाचा चुलत चुलत भाऊ, जवळचा नातलग त्याच्या पेक्षा वयाने वडील होता. याप्रत्राचे महत्व त्यात उल्लेखिलेल्या व्यक्तीमुळे आहे. लेखक साठे हे मोठे सावकार होते व त्याचा वैद्यांशी नात्याचा सबध झालेला आहे. कृष्णाजी हरीची मुलगी बाबुराव वैद्यांची स्त्री पुढे झाली. तसेच नारायणराव पेशव्याची बायको पार्वतीबाई ही त्याची दुसरी मुलगी होय. कोलटकर, जोशी, रास्ते, रामचंद्र महादेव परांजपे, जानू चिंबलकर ह्यांची मोठी सावकारी होती नानाजी नाईक जोशी हे बाबूजी ना जोशांचेच जवळचे नातलग होत सदाशिव ना रस्ते हे भिकाजी ना रास्त्याचेच बधू होत. शेणवी याचाही पैशाच्या व्यवहारात उल्लेख आहे. पुंडलिक ना रास्ते यांच्याशी वैद्याचा देवघेवीचा व्यवहार झाल्याचा उल्लेख पुष्कळ कागदपत्रात आहे. पण रास्ते घराण्याच्या इतिहासात याचा सबध कोठे लागत नाही (न. १३) हे पत्र लक्ष्मण बल्लाळ जोशी ( वैद्याचा कारकून ) यास कृष्णाजी हरींनी लिहिले आहे. त्यात त्याच्या न १५ च्या पत्रातील देवघेवीचा मजकूर आहे यात इंग्रजी लोखंडाचा उल्लेख आहे. यावरून इंग्लंडांतून तेव्हापासून लोखड येत असावे न. १६ व १७ ही पत्रे नारोबा ना रत्नपारखी यानी वैद्यांस मोघमच गरज भागवावी म्हणुन लिहिले आहे. बहुधा पेशाबा ही पत्रे असावी रत्नपारखीचा उल्लेख पुष्कळ कागदपत्रात देवघेवीबद्दल आहे. ते श्रीकारापुढे ‘भवानीशकर’ लिहित.त. न. १५ चे पत्र रामाजी ना वाकडे याचे असून त्यनी सौ राधाबाई इजला रु २८७५॥ वैद्याकडून देवविले आहेत यातील सौ. राधाबाई ही पंत सचीवाची सबधी असावी; पण सबध कळत नाही. तिने रु. ५०० पोचल्याची पावती ७-११-३९ रोजी वैद्यास दिलेली न. ११ चे पत्रात आहे वाकडे व वैद्य याचे पैशाचे व्यवहार कसे चालत याचे हे पत्र द्योतक आहे. हे वाकडे वाईचे राहणारे होत.

न. ५९ हे पत्र रामचंद्र गोपाळ करकरे (वैद्याचा दिवाण) याचे असून त्यात पैशाच्या वसूलीचा तपशील आहे. न १५ च्या कृष्णाजी हरी साठे याच्या पत्रातील बराचमा मजकूर यात आहे त्यात बापूभट पैठणकर व काशिबा ना बरडे या दोन व्यक्ती जास्त आल्या आहेत १७४१ च्या खतावणीतून याची नावे आलेली आहेत न. ८७, ८९, व ९३ ही पत्रे राघो हरी दरवे याची पैशाच्या मागणीबद्दल आहेत हा बदरावर व्यापार करीत असे, म्हणून त्यास पैसे वरचेवर लागत. नांदिवड्यास हे कुटुब अजून आहे. पत्राच्या शेवटी ‘लक्ष शब्द आहे श्रीकारापुढे ‘कराटेश्वर’ लिहिलेले आहे ‘कराटेश्वर’ हे शकराचे देवालय जयगडबंदर व नांदिवडे या पासून सुमारे एक मैलावर समुद्रकाठी आहे हे फार रमणीय असून देवालयाच्या खालून गोड्या पाण्याचाझरा ऊर्फ गगा वाहते व खाऱ्यापाण्याच्या समुद्राच्या लाटा त्यास येऊन भिडात. हे देवालय वैद्यानीं बाधल्याचा उल्लेख कागदपत्रात आहे. वैद्याचा देवावर श्रावण महिन्यात रूद्राभिषेक असतो व देवापुढे नंदादीप असतो. नं. ५६ हें महादाजी अनंत गोडबोले यांचें पैशाच्या वसुलीबद्दलचे पत्र आहे.

(ब) आतां **वैद्यांनी** लिहिलेल्या पत्रात कांही महत्वाची आहेत. न. ४ हे पत्र **गोवळकोटच्या** सन १७३५ मध्ये झालेल्या लढाईचें आहे. पण पहिला बंद न मिळाल्यामुळे ते बरोबर लागत नाही. त्यांत **नागोजीराव घाटगे, दुर्गोजी भोईटे, सताजी जाधव रामाजी महादेव बिवलकर, बाबाजी म्हसके,** या लढवय्या लोकाची व काही सावकारांची नावें असून अपरिचित शब्द आहेत न. २३ हे पत्र **संभाजी अंग्रे** यांस लिहिले असून यांत **चिमाजी अप्पाचा** उल्लेख आहे, पण पत्र अपुरे आहे. पत्राचे मागील बाजूस **रत्नाकर विट्ठल** याचा हरभऱ्याचा हिशोब लिहिला असून साल **आर्बैन** दिले आहे त्यावरून तारीख लावता आली. न. १४ चे पत्रात **कृष्णाजी हरी साठे** यास पैशाच्या व्यवहारा बा। माहिती विचारली आहे. त्याचे उत्तर त्यानी नं. १५ च्या पत्रान दिले आहे. यात **हैबतराव सुभेदार, महादाजी ना। सहस्रबुद्धे, गोविंद ना। दातार व परशुराम ना।** अनगळ, या नव्या व्यक्तींचा उल्लेख आहे. पुरवणी वै. द. खड १ च्या सूचीत ४ अन॰ळ दिले आहेत त्यात परशुराम हे नाव नाही. न. २५ हे पत्र **बापूजी गणेश जोग** यास **संगमेश्वरच्या** तादुळाबद्दल असून बदूक व पिस्तुले मागितली आहेत. यावरून **नांदिवड्यास** पूर्वी ही अस्त्रे तयार होत असावीत. न. २६ हे पत्र **बाळंभटानीं विश्वनाथभटास मानाजी पवार दुर्गोजी भोईटे,** व **नरसी सामराज** याजकडील कर्ज वसूल करण्याबद्दल लिहिले आहे. हे सर्व लोक लढवय्ये **गोवळकोट** च्या लढाईत हाते.

(क)इतर पत्रात पत्र १ असून त्यातील विशेष असा आहे की, **प्राणी** हे घराणे २०० वर्षापूर्वी **सासवडचे** रहिवासी असून त्याचा नात्याचा सबध **रामचद्रपत करकरे** याशी होता. **करकरे** व **प्राणी** हे कऱ्हाडे आहेत. मातुश्रीच्या अस्थि इतक्या लाबवर **वाई** ओलाडून **धोमास** का पाठवाव्या हे कळत नाही. **सासवडाहून आळंदीस** जवळ नेऊन पवित्र **इंद्रायणी** नदीत त्या टाकता आल्या असत्या. दुसरी गोष्ठ अशी की **प्राणी** यास सुतक असल्यामुळे 'कृतानेक' या शब्दा पुढे 'नमस्कार' हा शब्द लिहिला नाही. हा धार्मिक वृत्ति अजूनही पाळण्या सारखी आहे. धोंडो पत **विठ्ठल-गणेश** याचे काका **मेढ्यास** होते. तेव्हा तेथे ही प्राणी घराणे असण्याचा सभव आहे. नं. ३४, ३५, ३७, ३८ व ३९ ही पत्रे हुणमंते व श्री. देव चिंचवड यांचे मध्ये पैशाच्या देवघेवीचा झालेला पत्रव्यवहाराची आहेत. हुणमत्या बरोबर देव किती सचोटीने वागले हे यावरून समजणार आहे.

**३ हिशेब** नं १० मध्ये मोठमोठ्या लोकाचे दिवाण ऊर्फ दिमत यांची नावे आहेत. ही ७ नावें एका कागदात आहेत अशी क्वचित् सापडतात. चि. भिकूस जोडा ८२ खर्च पडला आहे यावरून **भिकंभट** यावेळी जन्मलेला होता. त्याची मुन्ज १७४६ मध्ये झाली. हरबाजी ना। कोण कळत नाही. न. ७२ हा **कृष्णाजी हरी साठे** यांचा हिशोब आहे. यांतील व्यक्ति महत्वाच्या असून त्याचे पैशाचे व्यवहार मोठ्या रकमाचे आहेत. नं. ७९ हा हिशोब **यशवंतराव महादेव पोतनिसांचा श्री. छत्रपतींच्या देण्याचा** आहे. **पोतनिसांचें खासनवीस** असेहि आडनांव आहे. हे घराणे शिवाजी

महाराजापासून मराठी राज्यास उपयोगी पडलेले आहेत. हल्ली हे घराणे सरजामदार असून इनामदारही आहे. हिशोबातील रकमा मननीय असून लिहिण्याची पद्धत ही अनुकरणीय आहे. रघुनाथ भट पटवर्धनाकडून रु. ७३० संभाजी आंग-ऱ्याचे चिठीवरून जमा आहेत. हा पटवर्धन नागपूरकर भोसल्यास सेनासाहेब सुभेगिरी मिळवून देण्यास फार उपयोगी पडला आहे याचे उपनाव झिंप्रे असेही आहे. यांतील 'अकबरी' मोहराबद्दल वर्णन कोशात किंवा नानासो चाफेकर याच्या पुस्तकात मिळत नाही. न. ८३ चे पत्रात वैद्यांना अष्टीचे कुरणापैकी ३००० गवत दिल्याबद्दल पोतनिसांनी मल्हारजी कुरण्यास लिहिले आहे. याच्या श्रीकारापुढे 'रामोजयति' आहे. न. ८५ हा सदाशिव गोविंद बाळ चा हिशोब आहे. पूर्वी हे घराणे सुखवस्तु असावे व याचा कृष्णाजी ना जोशी सातारकराचा सबंध असावा. न. ८६ हा राणोजी भोसल्यास दिलेल्या कर्जाचा हिशोब असून यांत निरनिराळ्या गोसाव्यास दिलेल्या रकमा आहेत. त्यात काही पुरी व गीर ही आहेत. उ. निर्मलगीर, रामपुरी इ. पुरवणी खडामध्ये ६ गोसाव्यांची नावे आली आहेत. त्यापेक्षां ही जास्त आहेत. न. ३३ मध्ये श्रीदेव चिंचवड कडून तिमाजी रघुनाथ हणमते याची आई आमा यास पोच झालेल्या रु. ६७१६॥- रकमेचा हिशोब आहे.

४ पावत्याः-नं. ११, ३३, ४८, ५४, ५५ ह्या पावत्या आहेत. दुसऱ्या पत्रात ह्या पैशाबद्दल उल्लेख आहे त्यास बळकटी दाखल हे कागद छापिले आहेत. सिलिमकर व कोकाटे यास अनुक्रमे ५ व २ रु. देण्यास सचिवांना अडचण पडावी हे आश्चर्य आहे. यावरून त्याची त्याकाळची हलाखी व्यक्त होते. न. २ व ३ मध्ये नालबंदीचे पैसे रघूजीनी आपल्या नोकरास वैद्याकडून देविले, त्याच्या पावत्या आहेत. न. ११ मधील सौ. राधाबाईचा सचिवाशी संबंध समजत नाही.

५ याद्याः—न. ९ मध्ये शिमग्याचे पोस्ट वैद्य छत्रपतीच्या कोणत्या नोकरास देत. त्याची यादी आहे. पोस्ट शब्द फार जुना दिसतो. न. ४७ ही वैद्याच्या येणे रकमेची याद आहे. यांतील व्यक्ती पूर्वी येऊन गेलेल्या आहेत. रकमाचे आकडे मोठे असल्यामुळे ही याद मुद्दाम दिली आहे. या कागदाचे आरंभी यादीला झडती असे म्हटले आहे. या महिन्याचे बोटखतावरून यांतील नावे व तारीख ही मुकरर होत आहेत. दोन्ही कागदावरून काही लोकाची पूर्ण नावे व आडनावे निश्चित करतां आली. न. ४३, ४४, ५२, ६१ या कापडाच्या याद्या वैद्याच्या जामदार खान्यातील आहेत. कपडे कोणाकडून मिळाले व कोणास दिले याचा यांत खुलासा असून बरीच कपड्याची नांवे अपरिचित आहेत. नं. ४४ व ६१ ही जामदार खान्यातील सिलक बंदाची दोन निरनिराळी पानें आहेत. यात कापडाचा लिहिलेला जमाखर्च पाहण्याजोगा आहे. न. ७४ ही यादी वैद्यांनी संभाजी आंग्रे यास घेऊन दिलेल्या कापडाची आहे यशवंतराव पोतनीस, अंताजी विश्वनाथ घाणेकर यास सणगे खर्च पडली आहेत. ही महत्वाची माणसें आहेत.

या शिवाय आणखी दागिन्यांच्या याद्या आहेत, नं. २२ च्या कागदांत सोन्याचे व जवाहीर दागिने व मोत्यांचे दागिने दिले असून त्यांचे वर्णन ही दिले आहे. त्या काळी बायकांच्या अंगावर कोणते दागिने घालीत हे यावरून कळते. यावेळी वैद्य घराण्यात कोणाचे तरी लग्न असावे, असें दागिन्याचे प्रकारावरून व वर्णनावरून अनुमान निघते. ते कोणाचे होते ते मला ठरवितां आले नाही काही दागिने अपरिचित आहेत पूर्वीच्या कागदात जिनसाच्या सख्येचा आकडा देऊन शिवाय अक्षरी आकडा देण्याची चाल होती नं. २७ ही यादी फार महत्वाची आहे. यांत १७४१ ते १७४५ पर्यंत ५ वर्षात कोणत्या कर्जदार लोकानी कर्ज नेले, ते काय दराने व कधी नेले, त्याची फेड कशी व केव्हा केली, खते परत नेली किंवा नाही, याचा तपशील सालवार दिला आहे. १७४० सालात १०० रु. व त्याहून जास्त रु. कर्ज काढणारी माणसे पुढे दिल्याप्रो आहेत. **धोंडो महादेव** रु. ३६८, **सातापा मारुलकर** रु १००, **नागोजीराव पाटणकर** रु. ४००, **कृष्णाजी महादेव रानडे** रु १००, **संभाजी आंग्रे** रु ३३०. रु. १००, हून कमी कर्ज नेणारी माणसे ही आहेत, पण ती कमी दर्जाची नव्हती असे दिसून येईल. शके १६६७ ( स १७४५ ) मध्ये **बाबूराव भोसले** यास रु. १३००, दिल्याचा उल्लेख असून त्याचे पुढे **ब्राह्मण** असे म्हटले आहे **भोसले** आडनाव ब्राम्हणांत होते की काय? **चंदाखानास** सोडण्यासाठी **रघुजीस** दिलेल्या रकमाचाही तपशील यात आहे म्हणून या यादीचे महत्व जास्त आहे त्र्यंबक विश्वनाथ केतकर यास १७४४ मध्यें रु. ५०० दिल्याचा उल्लेख आहे. ही यादी दरसाल वाढतच गेली आहे असे दिसून येईल. नं. ४८ ही कर्जदाराकडून येण्याच्या रकमेची यादी आहे.

नं. २८ पत्रात १७४० पासून १७५४ पर्यंत वैद्य घराण्यात घेतलेल्या सोन्याचे वजन, दर व एकदर किंमत दिली आहे ती रु १८४७६८=|| आहे. १७५३ मध्ये ४ सोन्याची कडी घेतलेली कोणास दिली किंवा घेतली याची माहिती दिली आहे १ कडे **बाळंभटाची** बायको ग. भा. **सरस्वतीबाई** इचेकरिता, २ रे **विश्वनाथ भटाची** बायको सौ. **उमाबाई** इचेकरता ३ रे **तुळोजी आंग्र्याचे** नावे **दाजी त्र्यंबकास** देण्याकरता व ४ थे **रघूजी भोसले** यांच्या नावे वऱ्हाडच्या सरसुभ्यास देणेकरता असा तपशील आहे या कागदावरून त्यावेळच्या सोन्याचे वजन लिहिण्याच्या पद्धतीची माहिती होते टीपेत याचा खुलासा उदाहरण घेऊन केला आहे. वजनेमापे सध्या बदलल्यामुळे ही माहिती महत्वाची आहे

नं. २९ मध्ये विकत घेतलेले सोने कोणाच्या दागिन्याकरता खर्च केले त्याचे नाव, वजन व किंमत दिली आहे याशिवाय आणखी सोन्याच्या तपशिलाची माहिती देणारे कागद पुष्कळ आहेत ते छापले नाहीत. त्यावरून कोण बायका सुवासिनी व विधवा होत्या, कोणाचे लग्न कोणत्या साली झाले वारसे कोणाचे झाले याचाही खुलासा होतो.

नं. ४०, ४१ हे कागद **गुराप्पा सोनारा** कडून कोणाचे दागिने करविले, हे जरी दाखवितात तरी त्यात नवीन नाणे '**रयाल**' हे दिले आहे. या नाण्याबद्दल

शोधन होणे जरूर आहे. हे दागिने भास्करभट **छत्रपती** बरोबर **मिरजेच्या** स्वारीत ोते, तेव्हां **म्हासाळ** मुकामी असतांना केले आहेत. पुरवणी खड १ मध्ये ाळंभटाचा म्हासाळ येथे मुक्काम असताना झालेल्या खर्चाचे हिशोब दिले आहेत.

न. ५३ हे पत्र **तुळोजी** अंग्रे यांचे विश्वनाथभटास सोनाराकडून दागिने रविण्याबद्दल आहे. त्यात गुजऱ्या हा दागिना आहे. **कोंकणापेक्षां वाई-साताऱ्या.** ाडील सोनार कसबी असावे गुजरी हा पायातील बायकाचा रुप्याचा दागिना आहे

**६ लढाया-** नं ४५ व ४६ ही पत्रें मला नीट लावतां आली नाहीत. पहिलें पत्र ोकणातील गडबडी सबधी असून ते **विश्वनाथ भटांनीं जयगडाहून** स्वत. लिहिले आहे. **केसोपंत** हा **केसो त्र्यंबक अंग्र्या** कडील कारकून असावा त्याने **महाड** घेतल्याचे लहिले आहे दुसरे पत्रात **अप्पाजी बावाचा** मुक्काम **तापीवर** दिला आहे व तेथें **शवे** आल्याचा व भोइटे ह्याचे जासूदही आल्याचा उल्लेख आहे. हा काय प्रसंग ामजत नाही. न २३ च्या पत्रावरून **संभाजी अंग्रे** याने **कुलाबा** घेतला नाही असे दसने. न. ४ मध्ये गोवळकोटच्या लढाईसाठी केलेल्या तयारीची माहिती बद २ ाध्ये दिली आहे. नं ५ मध्ये ही या लढाईचा उल्लेख आहे

**देवालयें व धार्मिक कृत्यें:--**

**वैद्यांनी** देवालये **कोंकणांत** बरीच बाधली वैद्याचे वडील **रघुनाथ भट** ानी **लावगनास लक्ष्मीनारायणाचें** देऊळ व **जयगडीं कऱ्हाटेश्वरांचें** देवालय ाधून त्याची स्थापना केल्याचा उल्लेख आहे (न. ४९ ५०, ५१ व ८४). या सबधाची पत्रे **नारो रघुनाथ थोरात** याचे हातची आहेत. या पत्रातून नवीन शब्द ालेले आहेत यांत '**हत्तीचें ओझें कोण उठवील**' ही म्हण आली आहे. देवळाच्या ाधणी सबधी **नांदिवड्याचे कृष्णंभट्ट** काळे याचे पत्र आहे त्यात देवळाच्या निर-नराळ्या भागाची अपरिचित नावे आली आहेत (न. ४९) न. ८६ मधील **रत्नाकर विठ्ठलाचा सातारा** शहराशी कसा सबध येतो हे देताना मगळवारांतील काळ्या रामाचे सेवेसाठी **छत्रपतींनीं** ज्या सनदा दिल्या आहेत त्यावरून देवालया-संबधी खालील गोष्ट विशेष वाटली, म्हणून देत आहे:-

आईसाहेब व, प्रतापसिंह महाराज याकडून ज्या सनदा श्री **रामाच्या** सेवेसाठी **गुजरास** मिळाल्या आहेत, त्यात श्री देवाच्या गाईच्या चाऱ्यासाठी मौजे **दरेखुर्द** येथील कुरण दिल्याचा उल्लेख आहे. यावरून देवाच्या सेवेकरता गाईची तजवीज करून तिच्या बाधण्यासाठी व चाऱ्यासाठी तजवीज करीत असत, असे दिसून येते. देऊळ बाधताना गाईसाठी गोठाही बाधीत असत असे अनुमान काढण्यास हरकत नाही. देवळातील देवाच्या जागेत गोठ्याचा ही समावेश होत असला पाहिजे. ही एक देवालयांसंबधी महत्वाची गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. कुरणाची सनद देताना 'देवाच्या गाई' व 'आपल्या गाई' असा उल्लेख त्यात केला आहे. या वरून

देवाच्या गाई निराळ्या होत्या असें स्पष्ट होते त्या गाईचें दूध देवाच्या नैवेद्यास पवित्र मानण्यात येत असल्यामुळें अशी सोय असावी असें म्हणण्यास हरकत नाही.

**वैद्यांचे मुक्काम:**- **वैद्य** तिघे बंधू **छत्रपतीजवळ** सल्लागार असल्यामुळे त्यांचे मुक्काम कळले तर पुष्कळ **घडामोडी** कळण्याचा संभव आहे जमाखर्चावरून ते कळू शकतील, पण मला ते पाहण्यास वेळ नसल्यामुळे पत्रे वाचताना जे समजले, तेवढेच दिले आहेत ( नं. १८, २१ ) ता. ३०।१२।३९ व ३।२।४० चे **बाळंभटांचे** मुक्काम यांत असून, दोघा भावाच्या **पुण्यास** गेल्यावर ३।२।४० नंतर झालेल्या हालचाली दिल्या आहेत.

## ९ सरंजामदार व सरदार वगैरेंची कांहीं पत्रें:—

( अ ) **भोसले:**—नं. ७४ हे पत्र **नारो अनंत गद्रे** यांनी **वैद्य बंधूस** लिहिले असून त्यात **कानोजीस** सनदा झाल्याचा मजकूर आहे **कानोजीचे** व **छत्रपतीचे** वाकडे होते, त्यास पकडण्याचा प्रयत्न केला होता. अशा स्थितीत त्याला पुनः कामावर घेणे संभवनीय नव्हते तो पळून गेल्यावर त्याचे काम **रघूजीस** दिले होते **वैद्यास** **वऱ्हाडातील राहाटगांवचा** मोकासा **भोसल्यांनी** दिला होता तो वसूल करण्या-संबधाने अडथळे येऊ नयेत म्हणून **रायाजी भोसल्याचे** पत्र **कराेजी भोसल्यास** मागितले होतें. **राहाटगांवांशीं** या भोसल्याचा संबध कसा येतो व **कान्होजीस** पुनः **सेनासाहेबसुभा** नेमला की काय या गोष्टीचे संशोधन होणें जरूर आहे **कानोजी** महाराजास संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करीत होता, असे काळेकृत नागपूर प्रांताच्या इति-हासांत आहे. पत्र नं ७५ व ७६ ह्यात **राणोजी भोसले** यानी **रत्नाकर विठ्ठल** व **वैद्यबंधू** याजकडे **वऱ्हाडचा** मामला कर्जफेडीसाठी गाहाण दिला होता, त्यासंबधाने दोघाचे जे करार झाले त्याचा मजकूर यात आहे **रत्नाकरपंत** याचे नाव नं ४ मध्ये आले आहे. तो **रत्नाकर विठ्ठलच** असावा. याची वैद्याशी फार देवघेव असावी. हा **साताऱ्चा** रहिवासी होता. **गोपाळदास जगदीशशेट गुजर** यास मंगळवार पेठेतील आपल्या घराजवळ बाधलेल्या **काळ्यारामाचे** पूजेअर्चेसाठी **छत्रपतींनी** मौजे **दरेखुर्द** येथे एक इनाम जमीन दिली होती त्यास दिलेल्या ता. १४-३-१७९४ च्या इनामपत्रात जमिनीची चतुःसीमा देताना उत्तरेस **रत्नाकर विठ्ठल** यान्ची जमीन दिली आहे. यावरून त्याचा **साताऱ्यांशीं** पूर्वापार संबध दिसतो. **वैद्य** हे पूर्वी **साताऱ्यासच** राहत असत. म्हणून दोघाचा जुना पुराणा देवघेवीचा संबध असणे शक्य आहे. नं. ८६ यात **राणोजी भोसल्यानें** जे कर्ज काढले त्याचा हिशोब आहे त्यात **गोसाव्यांचे** दोन **नांव** प्रकार **पुरी** व **गीर** असे दिले आहेत त्या दोघाशीही त्याचा व्यवहार होता. पुरवणी खंडामध्ये ६ गोसाव्याची नावे आली आहेत. नं. ८८ हे **राणोजीनें रत्नाकर विठ्ठल** व **वैद्य** यास लिहिलेले पत्र असून त्यावर त्याचा शिक्का व मोर्तबही आहेत त्यात **रघूजी भोसले** यानी **विठोबा नाा वाकडे** व **कोनेरराम कोल्हटकर** याजकडून **शिवरामगीर** यास रु ३३७५ दिल्याचा **उल्लेख** आहे. गोसावी हे देवघेवीचा मोठा धंदाच करीत.

(आ) **अंग्रे**:— नं. २३, ५३, ६२ व ७४ ह्या पत्रांत **अंग्र्यांचा** संबंध आला आहे. न. २३ वरून कुलाबा अंग्र्याने घेतला नाही असे दिसते. नं. ६२ हे पत्र फार महत्वाचे आहे हे पत्र **संभाजीनें शाहूमहाराजांस** लिहिले आहे. यावर शिक्का व मोर्तब आहे **मानाजी** व **संभाजी** यामधील कलह मिटविण्यासाठी **छत्रपतींनी** दोघास **सातान्यास** बोलावले होते. **मानाजी** घाटावर आल्याचे कळले तरच आपण येतो असे **संभाजी** लिहितो. यावरून त्याचा आग्रही स्वभाव व्यक्त होतो. तसेंच शाहू **छत्रपतींची** वृत्ति तंटे मिटविण्याकडे असे हें ही यावरून दिसून येते. बाकीची पत्रें इतर मजकुराची असल्यामुळें त्याचा उल्लेख इतर विषयांत होऊन गेला आहे. त्यांस राजकीय महत्व नाही. तथापि, ही पत्रे **संभाजी** व **तुळाजी अंग्रे** यांचा **वैद्यांवर** विशेष विश्वास व निकट सबंध दर्शवितात. न. ५ मध्ये अंग्रे हे मवास (लुटारूंचे नायक) झाले, असे म्हटले आहे.

(इ) **सोमवंशीः**- यांचा २ पत्रांत उल्लेख आहे. नं. ४७ वरून इतकेच निघते की, आपाजीकडून **वैद्यांचे** कर्ज येणें होतें. कारण ती येण्याची यादच आहे. त्यांचा दिमत **बाबूराव रघुनाथ** याचाही त्यांत उल्लेख आहे. न. ४८ हे **प्रतापजीस** पावतीवजा **वैद्यबंधूंचें** पत्र आहे. हे पत्र शेवटी न ४८ घालून छापले आहे. **बीड आंबडचा बाबतीचा** वसूल **पंतसचिवांकडून** मिळाल्याच उल्लेख यात आहे. **वैद्य, सदाशिव दिक्षित** व **पंतसचिव** यांचा **प्रतापजीशीं** २४००० चा काय संबध पोचतो ह्याचे सशोधन होणे जरूर आहे.

(ई) **पेशवे**— न. २० मध्ये **पेशव्यांस वैद्यांनीं** ५०००० रु. दरमहा द. शे १८२ व्याज ठरवून दिल्याचा उल्लेख आहे. हे **कृष्णाजी हरी साठ्यांचें** पत्र असावे. **पेशव्यांस** जास्त रक्कम पाहिजे होती ती **महादोबा ना बामळे** व **वल्लभसुंदर** याजकडून देण्याची तजवीज केलेली दिसते यातील **राजपुरीवाला** व **वल्लभसुंदर** या व्यक्ती कोण हे मला समजले नाही. हा सशोधनाचा प्रश्न आहे.

(उ) **हणमंतेः**- याचेबद्दल नं. ३० ते ३९ च्या पत्रावर टीप दिली आहे, त्यावरून माहिती होईल.

(ऊ) **प्रतिनिधी**- नं ५८ मध्ये **जगजीवन परशुराम** ऊ. **दादोबा** यानी **कृष्णाजी ना जोशी बारामतीकर** यास **कोल्हटकराकडून** ३००० देविले. न **वैद्यांनीं शेवड्यांकडून** दविले आहेंत. श्रीकारापुढे ' आई आदी पुरुष ' अक्षरे आहेत.

(ऋ) **पंत सचीव**—**छत्रपतीच्या** सागण्यावरून **पंतांनीं** मौजे **जाभळी** व **मोहरी बुद्रक** तर्फ **गुंजण मावळ** या गावच्या इनामाच्या सनदा वैद्य बधूस दिल्यात्याबद्दल 'सनदा' या सदराखाली माहिती दिली आहे. या शिवाय न. ५४, ५५, ६०, ७८, ८१, ८२ व ९१ हे कागद केवळ निरनिराळया लोकास पैसे देण्याबद्दल वैद्य बधूना चिटचा **चिमणाजी नारायण सचिवांनीं** दिल्या असून ते पोचल्याबद्दल पावत्या आहेत. पण त्यावरून असे दिसते की, **कर्डेराजगांव** व बीडआवड याचा मामला **पंतांनीं वैद्याकडे** गहाण ठेऊन कर्ज काढले होते. गहणाचे हप्ते टरविले होते. पतानी त्यापैकी हे पैसे त्यांज–

करून देवविले होते. नं. ६० मध्ये **विश्वनाथ जोशी** ( चिपळूणकर ) यांस रु. ९९० **त्र्यंबकराव माणकेश्वर** याच्या मार्फत देविले आहेत. नं. ८१ मध्ये **मदनसिंग भोसल्याची** पावती ३०॥- ची आहे. पुढे ४–५–४१ च्या पत्रात त्याला पैसे देण्याब॥ मजकूर आहे. याचे नांव नागपूरचे **भोसल्याचे** हिशोबात आहे. दोघे एक कसे ? ह्या माणसाचा पतांशी देण्या घेण्याचा काय संबंध होता समजत नाही. नं. ९२ मध्यें **अंताजी ना॥ भिडे** याचे कर्जफेडीसाठी रु. १२०० देविले आहेत. ह्या भिड्यांचे वंशजाचा अजून भोर संस्थानांत इनाम गाव चालू आहे. भिडे व **सदाशिवभट दिक्षित** यांचा विशेष संबंध असावा. नं. ११ मधील **सौ.** राधाबाईचा व सचिवाचा संबंध काय कळत नाही. **वैद्यांनीं बाजीराव बल्लाळ** पेशव्याच्या कारकीर्दीपासून **पंतांना** कर्ज दिले होते. त्याचा हिशेब करून वैद्याचे पैसे पताकडे सुमारे २ लाख निघाले त्याचे मागणें करण्यासाठी जो हिशोबाचा कागद तयार केला त्याचा तपशील कागदपत्रात आहे. तो कागद सबंद वाचला असता वैद्याच्या व्यवहाराची पूर्ण कल्पना येणार आहे. **चिठ्या, हुंड्या बेचन** वगैरे व्यवहार कसे होत याचाही या कागदावरून बोध होतो.

( ऋ ) **गोविंद सामराजः— सचिवांनीं** वैद्याना **जांभळीं** व **महुरीबु॥** गावच्या सनदा दिल्यानंतर त्याचे बजावणीसाठी **गोविंद सामराज** नामजाद सुभेदार प्रांत मावळ म्हणून आज्ञापत्रे काढली आहेत. या शिवाय यानी **वैद्य यांस** कर्जाबद्दल लिहिलेली नं. ६९, व ७० ही पत्रे आहेत त्यानी **ग्वाल्हेरनरवर** व **शाहबाद** येथील मामलत घेतली होती त्यासाठी अगोदर पैसे भरण्यासठी वैद्याकडे पैसे मागितले होते. ह्या कुटुम्बास प्रां मावळचाची सुभेदारी कशी मिळाली, या-बद्दल माहिती याच्या वंशजांनी इंग्रज सरकारकडे उत्पन्न चालविण्याबद्दल कैफियत दिली होती, त्यात आहे ती पे. द. भाग ४४ पान ११ वर छापली आहे त्यात वंशावळ चुकीची आहे. त्यांत गोविंद याचा मुलगा रामचंद्र दिला आहे. पण आमच्या १७४१ मधील पत्रावरून तो भाऊच होता असे म्हणतां येईल. कैफियतीतील वंशावळी व माहितीही विश्वसनीय नसते. ती केवळ उत्पन्न मिळविण्यासाठी तिखटमीठ लावून लिहिणे सहाजिक आहे.

# आभार प्रदर्शन.

## खंड दोन व तीन.

[ दोन्ही खंड एकाच वेळीं प्रसिद्ध होत असलेमुळें खंड २ व ३ चे आभार प्रदर्शन २ मध्यें केलें आहे. ]

खंड २ ची प्रस्तावना बरीच मोठी झाल्यामुळे काही महत्वाच्या कर्तबगार पुरुषांबद्दल कागदात आलेला उल्लेख देऊन त्याबद्दल ऐतिहासिक माहिती देणेचें रहित करावें लागले. तथापि यात गाळलेल्या व्यक्तीबद्दल पुढील खडातील कागदात त्याचा उल्लेख आल्यामुळे त्याच्या प्रस्तावनेत त्याबद्दल माहिती दिली आहे .

माझ्या दप्तरांतील ऐतिहासिक कागद छापण्यास शके १८६६ मधे म्हणजे ४ वर्षापूर्वी सुरवात केली. त्यावेळीं मी वृद्ध होतो. आता तर ७७ वे वर्ष लागले आहे. यामुळे जास्तच क्षीणता आली आहे. पहिली २ पुस्तके लागोपाठ छापली. आणखी कागद निवडून पेशवाई अखेर ते छापून काढण्याचा सकल्प केला होता. पण छपाईच्या अडचणी फार वाढत गेल्यामुळे सकल्पित कार्य सोडण्याचा प्रसग येतो असे वाटू लागले. चिरंजीव बाबुराव यानी प्रतिकूल परिस्थितींतही ते कार्य हाती घेऊन आणखी २ खड छापून प्रसिद्ध करण्याचा योग आणला आहे. त्यानी या कामी लक्ष घातले असून १७४३ ते १७४९ अखेर सुमारे ३०० चे वर पृष्ठाचा ४था खंड दिपवाळीत प्रसिद्ध करणेची उमेद धरली असून ४ सालातील पत्राची छपाई सुरू झाली आहे.

गेल्या ४ सालात सालवार तारखाच्या क्रमाने कागद लाऊन व नकलून तयार केले, व त्याची पुडकी तयार केली. हिशोबाचे कागदही सालवार लावून ठेविलें आहेत. त्याचा उपयोग ज्या सरदार व सावकार घराण्याशी वैयाचा, राजकीय, सामाजिक, आर्थिक वें नात्याचा संबध आला त्यांच्या पत्रांच्या निश्चित तारखा ठरविण्यात येतील. मला हिशोबी कागदाचे या दृष्टीने फार महत्व वाटले. घराण्याचे इतिहास ज्यानी गेल्या ४ सालात लिहिले त्यास माझ्या कागदाचा उपयोग झाला व त्याचा उल्लेख त्यानी आपल्या पुस्तकात केला आहे.पुढें आणखी कोणी घराण्याचे इतिहास लिहितील त्यासही कागद दाखविण्यास केव्हाही मी तयार आहे. विश्वविद्यालयाचे पी.एच्.डी.पदवीसाठी विशेष व्यक्ती सबधी किंवा काळासंबंधी ज्यानी ऐतिहासिक प्रबंध घेतला त्यानी माझे कागद पाहून त्याच्या नकला करून घेतल्या. पेठे, आंग्रे चदाखान, थोरले माधवराव, रघुजी भोसले, घोरपडे यांचे बद्दलचे कागद अशा प्रकारचे होत.

कांहीं व्यक्तींच्या अक्षरांसाठी पत्रांचे फोटोही नेण्यांत आले आहेत. रा. **यशवंत रावजी फफे** यांनी पत्राचा मजकूर वाचणें, तारखा लावणें, व पत्रांची निवड करणें याबद्दल निरपेक्ष बुद्धीने मदत केली आहे व करीत आहेत. तसेच ४ पुस्तकाच्या पत्रांची सूची रा. कृष्णरावजी पेडसे यानीं बिन तक्रार करून दिली. तसेच पुढेही करण्यास ते मागे पुढे पाहणार नाहीत अशी मला खात्री वाटते. या दोघाचे मला कसे आभार मानावेत हे कळत नाहीं. याशिवाय आणखी काही व्यक्तींची मला कमीअधिक प्रमाणाने मदत झाली आहे, त्याचा स्थल-संकोचास्तव नामनिर्देश न करतां त्याचे मनःपूर्वक आभार मानतो. खंड २ हा सातारच्या आनंद प्रेसमध्ये छापला आहे. त्याचे व्यवस्थापक रा. रा. अनतराव कुलकर्णी यांनीं इतर जबाबदाऱ्या सभाळून तो छापून दिला याबद्दल त्याचे आभार मानले पाहिजेत.

खंड ३ रा राजगुरू प्रेसचे रा. गानू यानी छापण्याची तयारी दाखविल्यामुळे खंड २ बरोबर तो प्रसिद्ध करता आला याबद्दल त्याचा मी आभारी आहे. भा. इ. सं. मडळाचे चिटणीस रा. चिंतोपत कर्वे यानी संस्थेचा ' पुरस्कार ' लिहून दिलेला छापण्यात आला आहे. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. माझ्या दफ्तरांतील कागदाचा हिंदुस्थानच्या इतिहासात भर घालण्यास उपयोग करण्यात आला तर माझ्या श्रमाचे चीज झाले असे मला वाटेल यात शंका नाहीं.

श्रावण वद्य १४<br>शके १८७०

शंकर लक्ष्मण वैद्य

# ऐतिहासिक पत्रांचे प्रकाशनासंबंधीं अडचणी

लेखकः— **शं. ल. वैद्य**, ३७६ बुधवार पेठ, पुणें, यांनी " भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें, या संस्थेच्या वाढदिवसप्रसंगीं तारीख १९—६—४७ गुरुवार रोजीं मंडळाच्या सभेपुढें वाचलेला निबंध. "

**मुख्य मुद्दे**:— मोडी लिपीचे परिचयाची आवश्यकता— जुने ऐतिहासिक पत्रसंग्रह ज्यांचेजवळ अद्याप आहेत ते प्रकाशित व्हावेत अशा इच्छेचें पत्रसंग्राहकाचें सहेतुक औदासिन्य—जुन्या कागदपत्रांतील जमाखर्ची कागदाचें ऐतिहासिक महत्त्व— जुने कागद संग्रहित झाल्यास त्यांची कालानुक्रमें करावयाची जुळवणी— ऐतिहासिक उपयुक्तीची अगर अनुपयुक्तीची छाननी करणे—युक्तायुक्तता ठरविणेचे बाबतींत "इतिहास" या शब्दाचे अर्थाची व्याप्ति मनांत नीट बिंबलेली असण्याची जरूरी— जुने कागदाची चाळणा सुरू असतां व्यक्ति, स्थळें व घटना, त्याचे परस्परांशीं संबंध, व त्याची पूर्वपीठिका इतर ग्रंथांच्या संदर्भावरून मनांत नीट ठसलेली असण्याची जरूरी— जुने कागदाची चाळणा सुरू असतांना त्यातील मजकूर व त्याचा कांहीं भाग, तत्कालीन ऐतिहासिक घटना, व प्रश्न (सामाजिक, आर्थिक, जातीय, धार्मिक, शासनिक, राजकीय वगैरे) कोणत्या विशिष्ट अंगाशीं संबद्ध आहेत हे ठरविण्यास मन समतोल ठेवून तत्काळ त्या त्या योग्य सदरांत ते ते प्रश्न विभागण्याची कुवत असणेची आवश्यकता. ऐतिहासिक जुन्या कागपत्रांच्या प्राथमिक अभ्यासकांस जुन्या कागदाचे वाचन व वर्गीकरण करण्याच्या कार्यांत उपरिनिर्दिष्ट गोष्टींची नड भासूं नये व तशी नड भासल्यास ती दूर करण्याचा प्रयत्न हातीं घेणेची वेळ आतां आली आहे.

माझ्या निबंधाचा विषय 'जुने ऐतिहासिक कागद मिळवून त्यांची जुळवणी करण्यास व प्रकाशनास येणाऱ्या अडचणी' असा आहे. याचे दोन मुख्य भाग पडतात १ जुने ऐतिहासिक कागद मिळविणें व २ ते मिळाल्यावर लावणे म्हणजे छापण्यासाठीं तयार करणे. या दोन्ही गोष्टी करण्याचे कामीं मला ज्या अडचणी आल्या त्या मी सांगणार आहे. **कागद जुने** कोणते हेही समजले पाहिजे. हे कागद बहुधा जुन्नरी असून मोडी लिपींत लिहिलेले असतात. त्याचा काल इंग्रजी अमल सुरू होण्यापूर्वीचा म्हणजे १८१८ पूर्वीचा असेल व त्यांत मराठी राज्यांतील घडामोडींची माहिती असेल तर त्यांचे महत्त्व ऐतिहासिकदृष्ट्या फार असते. असे कागद कोठे आहेत व **ते कसे मिळवावेत** याची माहिती कै. राजवाडे यांनीं ' मराठ्यांच्या इतिहासाचीं साधने ' छापतांना ज्या प्रस्तावना लिहिल्या आहेत त्यात उत्कृष्ट दिली आहे. तसेच ते कागद मिळविण्यास काय अडचणी येतात याचा स्वानुभव त्यांनीं त्यात दिला आहे. त्यांच्या व माझ्या अडचणी बऱ्याच एकच असणार हे उघड आहे. या अडचणी देण्याचे मनांत येण्याचें कारण अलीकडे शाळेत शिकविला जाणारा इतिहास एकतर्फी इंग्रजांची स्तुति करणारा, केवळ लढाईचेंच वर्णन देणारा, इंग्रजांच्या बाजूनें लिहिलेला, असत्य, निराधार गोष्टींचे निवेदन करणारा आहे असे म्हणणारे लोक फार आढळून येतात व त्यामुळे **खरा इतिहास** तयार करण्यासाठीं आतुरता दाखविणारे लोक वाढूं लागले आहेत असे वाटतें.

खरा इतिहास समजण्यास जुन्या अस्सल कागदपत्रांचा संग्रह करणें जरूर आहे, असें तेही म्हणतात. असे कागद पेशवे-दसरांत, मुंबई सरकारच्या दफ्तरखान्यांत, डेक्कनकॉलेजांत, भा. इ. सं. मंडळाचे दफ्तरखान्यांत, धुळ्याचे राजवाडे-मंदिरांत, (राजवाडे, पारसनीस, चांदोरकर वगैरे संशोधकांनीं जमा करुन दिलेले) आहेत. त्यांतील कांहीं छापून वरील संशोधकांनीं प्रसिद्ध केलेले आहेत व अजून त्यांतील कागद तपासून प्रसिद्ध करण्या-जोगे निवडून काढण्याचे काम नवीन संशोधक करीत आहेत. हे काम फार मोठें आहे. प्रकाशनाचें, संशोधनाचें व कागद मिळविण्याचे जें काम झाले आहे, तें कागदांच्या संख्येच्या मानाने फार थोडें आहे. या कागदांत वेळ घालविणें म्हणजे मेलेलीं मढीं उकरून काढणें आहे असे म्हणणारे लोक नाहींत असे नाहीं. पण नुकतीच येथें '**इतिहासशिक्षणसमिति**' स्थापण्यांत आली असून खरा इतिहास विद्यार्थ्यांस शिकविला पाहिजे असें जोरानें प्रतिपादन करणारे शिक्षक समितीच्या सभेत आपण पाहतो. खरा इतिहास जुन्या कागदपत्राचे संशोधनाशिवाय निघत नसतो, ही गोष्ट सर्वमान्य आहे. **न्या. मू. कै. रानडे** यानीं, कै. वाड यांनीं पेशवे-दफ्तरांतील ऐतिहासिक कागद निवडून रोजनिशांचे जे कांहीं भाग छापविले त्यांस **प्रस्तावनाही लिहिली आहे.** ती वाचली असतां या जुन्या कागदांचे ऐतिहासिकदृष्ट्या विविध तऱ्हेचें **महत्त्व सहज कळून** येणार आहे. तसेंच जमविलेल्या कागदांच्या सहाय्याने व इतर पुस्तके वाचून त्यांनीं '**Rise of the Maratha Power**' या पुस्तकाचा इंग्रजींत पहिला भाग छापून काढला व दुसरा भागही प्रसिद्ध होण्यास हरकत नव्हती; पण पुस्तक लिहिण्याचें काम चाललें असतांना जुने नवीन कागद उपलब्ध होऊन त्यांत नवीन माहिती उपलब्ध होऊं लागल्यामुळें आपलीं '**ऐतिहासिक अनुमानें**' खोटीं ठरतील असें वाटून त्यांनीं दुसरा भाग प्रसिद्ध करण्याचें रहित केलें. यामुळे त्यांच्यासारख्या गाढ विद्वानास **जुन्या ऐतिहासिक कागदांचें महत्त्व** पटून त्यांनीं जास्त कागद मिळवून त्यांचे संशोधन करण्याची आवश्यकता व्यक्त केली. ही अवश्यकता व्यक्त झाल्यावर जरी अर्धशतक होत आलें तरी ती अजून नाहींशी झाली नाहीं, असे मला वाटते. **कागद मिळविणारे** व त्याचें **संशोधन करणारे** यांची उणीव फार आहे. लोकांच्याजवळ कागद असून ते मिळावले जात नाहींत ही आश्चर्याची गोष्ट आहे. काही लोकांचीं जुनीं दफतरे **कसरीनें खाल्ल्यामुळें, भाऊबंदकीमुळें** व स्वतः निरुपयोगी समजून **वाण्यास विकल्यानें** किंवा त्यांची अडगळ नाहींशी करण्यासाठी तीं **जाळून टाकल्यामुळें** किंवा **नदींत फेकून दिल्या-मुळें** नाहींशीं झालीं आहेत ही गोष्ट खोटी नाही. श्रीमंत सरदार घराण्यांचीं दफतरे सरकारानें कांहीं राजकीय उद्देशानें जप्त करून नेली होती, पण त्यांतील त्या वेळच्या अमलदारांनीं आपल्या बुद्धीनें त्यांतील कांहीं कागद निवडून पेशवे-दफतरांत ठेविले आहेत. काहीं परत केलेलीं दफतरें अशा घराण्यांत अजून आहेत हे मीं आमच्या घराण्यांतील दफतरांची जी हकीकत वैद्य-दप्तर खंड १ च्या पान २२ मध्यें दिली आहे, त्यावरून कळून येईल. पूर्वीच्या सरदार, सरंजामदार व सावकारी करणाऱ्या घराण्यांच्या वंशजाजवळ अशीं दफतरे सांपडण्याचा अजूनही पुष्कळ संभव आहे. जुने कागद दाखविण्यास ५०।६० वर्षांपूर्वीं लोक साशंक असत. त्यांत कांहीं उत्पन्नाचे कागद असल्यास पुढेंमागें कोणीतरी आपल्या घराण्यांतील पुरुष त्याचा उपयोग उत्पन्न मिळविण्यास किंवा घालविण्यास करील असें विचार मनांत येऊन लोक कागद जवळ असून दाखवीत नसत किंवा कागद नाहींत असें स्पष्ट म्हणत; पण आतां तशी स्थिति राहिली

नाहीं. अजूनही एखादा संशोधक कागद दाखवा असें म्हणूं लागला, तर कित्येक लोक असें सांगतात कीं, दफतरांत पत्रें नाहींत, नुसते जमाखर्चाचे कागद आहेत, त्याचा तुम्हांस काय उपयोग? पुष्कळांना जमाखर्चाचे कागद निरुपयोगी वाटतात; पण खरी वस्तुस्थिति अशी आहे कीं, जमाखर्चांत कांहीं गोष्टी इतक्या विस्तृत व निश्चित दिलेल्या असतात कीं, त्यामुळें कागदांतील मजकूर चांगला स्पष्ट होतो. असे कागद कोणाजवळ संग्रहीं आहेत हें कळणे कठीण आहे. कारण मजजवळ जुने ऐतिहासिक कागद आहेत असें सांगण्यास येणारीं माणसे, त्याचे महत्त्व न कळल्यामुळे, फारच थोडीं आढळतात. घरोघर हिंडून विमा कंपन्यांचे एजंट जसे चिकाटीनें विम्याचे फॉर्म भरून घेतात तसे हे कागदाच्या संग्रहाचीं ठिकाणे ठरविण्याचे काम हौसेनें करणारीं माणसें जेव्हां तयार होतील, तेव्हां कागदाचे ढीगच्या ढीग इतके जमा होतील कीं, ते आपल्या मंडळासारखीं १०।५ घरे जेव्हां मिळतील तेव्हां त्यांत कसेबसें ठेवतां येतील. साताऱ्यांत **पूर्व पेशवाईतील** अजून जुनीं घराणीं व त्यांचीं घरे आहेत. त्यांत माळयावर धुराळा खात पडलेलीं, कोणीं न पाहिलेलीं, दफतरेंही सांपडण्याचा संभव आहे. **उत्तर पेशवाईतील** प्रसिद्ध घराणीं पुण्यांत आहेत त्यांच्या घरींही कागद असले पाहिजेत. हौसेने कागद जमा करण्याचे काम चिकाटीनें करणारी सेना तयार झाली पाहिजे. मग कागदाचीं ठिकाणे सहज कळून येतील व कागद जमा होतील.

२. माझ्या विषयाच्या पहिल्या भागाबद्दल मला स्वतःला कागद मिळविण्यासाठीं थोडे फार श्रम करावे लागले, तरी ते राजवाडे, पारसनीस वगैरे संशोधकांपेक्षां कमीच, यांत शंका नाहीं. मला माझ्या घरची व भाऊबंदाकडील जुन्या कागदांचीं एकंदर २०।२५ पोतीं भरतील इतकी दफतरे मिळालीं, तीं कशीं मिळाली याची सविस्तर माहिती माझ्या दफतराच्या प्रसिद्ध केलेल्या कागदांच्या खंड १ मधील पुस्तकांत पान २१, २२ व २३ वर दिली आहे. ती वाचण्यांत किंवा सांगण्यांत मी वेळ घालवीत नाहीं. माझ्याजवळील कागद इतके विपुल आहेत कीं, ते वाचून लावण्यास माझें उर्वरित आयुष्य पुरेल असे वाटत नाहीं. मीं जुने कागद मिळविण्यासंबंधाचा संशोधकांचा अनुभव वर दिला आहे. आणखी कागद कोठे मिळतात कीं काय याबद्दल चौकशी करण्याचा मला एक नादच लागला आहे, यामुळे तोही अनुभव मला आलेला आहे. माझ्या घरचींच जुनीं दफतरे सोडून कागद पाहतांना माझ्या नाकातोडांत राजवाड्याप्रमाणें धुराळा गेलेला आहे. तो धुराळा खाऊन काम करण्यास तयार होणारे इतिहासप्रेमी अभ्यासक उपलब्ध होणें फार कठिण झालें आहे.

३. आता **कागद मिळाल्यावर ते लावण्यास** म्हणजे छापण्यासाठीं तयार करण्यास लागणारे गुण अंगात असावयास किंवा यावयास पाहिजेत. त्यांपैकीं मुख्य पहिला गुण म्हणजे **मोडींत लिहिलेले कागद वाचण्याची कला** होय. मोडी वाचावयास कोणीं कागद आणून दिला तर तो बरोबर वाचून दाखविणे ही एक मला एखाद्या उत्तम कारागिराच्या कलेसारखी कलाच वाटूं लागली आहे. ही कला मंडळाचे अध्यक्ष म. म. पोतदार यांस चांगली अवगत झाली आहे असा त्यांचा लांबवर लौकिक आहे. मला मोडीं पत्रे नातेवाइकांकडून आलेलीं वाचण्याची आवड असे, व स्वतः मोडींत पत्रे व जमाखर्च लिहिण्याची संवय असे. तेव्हां कागदांत काय मजकूर आहे व तो ऐतिहासिक अगर घरगुती माहितीचा आहे एवढे ठरविण्यास ही कला माझ्यात पुरेशी होती. माझ्या लहानपणीं शाळेंतच मोडी वाचन व लेखन मला चांगलें शिकविण्यांत आले होते. तो आवश्यक विषय होता. व्ह. फा. परीक्षेत मोडीवाचनाची तोंडी परीक्षा घेण्यास मामलेदार कचेरींतून फाइली

आणीत असत. मी बरींच वर्षे परीक्षकही होतो. आतां व्ह. फा. परीक्षेला ह्या विषयाची तोंडी परीक्षाच नाहीं, या ज्ञानाशिवाय परीक्षा पास होतां येते. याचा इतका वाईट परिणाम झाला आहे कीं, आमच्या सारख्यांस मोडींत पत्रे लिहिण्याची बंदीच झाल्यासारखी झाली आहे. कारण ज्यांना पत्र पाठवावयाचे त्यांस मोडी वाचतां येईनासे झाले आहे. कोर्टात अर्ज करावयाचा तर तो जज्जसाहेबास दुसऱ्याकडून वाचून घेण्याचा प्रसंग येतो. तो कारकुनाने नीट वाचला तर ठीक, नाहीं तर त्याचा भलताच परिणाम होतो. मोडींत पत्र लिहिण्याने वेळ वाचतो. मोडी पत्रे लावण्याचा नाद लागला म्हणजे संदर्भाने शब्द किंवा अक्षरे ठरविण्यांत एक प्रकारें आनंद होऊन मानसिक शक्तीची वाढ होते, ही गोष्ट मोडी जुनीं पत्रे लावतांना चांगलीच कळून येते. ह्या मुलांच्या मानसिक शक्तीच्या वाढीचा फायदा शाळेच्या विषयांतून मोडीवाचन व लेखन काढल्यामुळे अजीबात नाहींसा झाला आहे. प्रस्तुत इतिहाससंशोधनाच्या मार्गांत मोडीचे अज्ञान ही एक मोठीच धोंड आहे, असे कोणीही म्हणेल. 'इतिहास-शिक्षण-समितीं'त जुने मोडी कागद वाचणारे शेकडा ५० तरी असतील किंवा नाही याची शंका आहे. खरा इतिहास बनविण्याचे या समितीचें ध्येय असेल तर त्यांनीं प्रथमतः मोडी कागद वाचण्याचा वर्ग काढून त्यांत तरबेज झाले पाहिजे. मंडळाचे अध्यक्ष म. म. दत्तोपंत हेच त्या समितीचे अध्यक्ष आहेत. त्यांना इ. सं. मंडळास उर्जित अवस्था खरोखर आणावयाची असेल तर सर्व उद्योग बंद ठेवून सध्याच्या सरकारकडून मोडीवाचन हा विषय आवश्यक करून घेतला पाहिजे. पूर्वी हा विषय शाळेंतून काढूं नये व कोर्टकचेऱ्यांतून मोडी लिपी बंद करूं नये, म्हणून जशी जोराची चळवळ झाली, तशी आतां तो विषय शाळांतून आवश्यक केला पाहिजे म्हणून करणे जरूर आहे. ही चळवळ जर लवकर सुरू केली नाहीं तर खरा इतिहास कागदपत्रांतून तयार करण्यासाठीं आमची संस्था स्थापन झाली आहे ही पोकळ बडबड आहे असे म्हणण्यची पाळी येईल. माझे कागद लावण्यास मला मदत करण्यास नव्या पिढींतील मनुष्य मोडी वाचनाच्या अज्ञानामुळे निरुपयोगी ठरतो. कागदाची मराठी नक्कल करण्यास आपण जेव्हां कागद वाचून एखाद्यास लिहिण्यास सांगावें तेव्हां आपला वेळ मोडून नक्कल तयार होते. मोडीचें महत्त्व इतिहाससंशोधनाचे कामीं किती आहे हे माझ्यापेक्षां आपले अध्यक्ष जास्त खुलवून सांगतील.

४. मला मोडीवाचनाची अडचण जुने कागद लावतांना प्रथमतः थोडी भासली; पण पुढे माझे सहकारी रा. यशवंतराव फफे यांच्या साहाय्याने ती बहुतेक नाहींशी झाली असें म्हणतां येईल. त्यानंतर शाळेंत हिंदुस्थानचा इतिहास जरी शिकलो होतो तरी मध्यंतरीं २५।३० वर्षे कॉलेजांतील व नोकरींतील व्यासंग अगदींच निराळा पडल्यामुळे पुनः **ऐतिहासिक पुस्तकें वाचणें भाग पडलें.** त्यांपैकीं मुख्य रा. ब. सरदेसाई यांच्या रियासतींचीं पुस्तके वाचलीं. त्या पुस्तकांस **सूची** दिल्या आहेत ही गोष्ट चांगली आहे; पण पुस्तकांत **विशेषनामें-नांवें व स्थळें मोठ्या टाईपांत** न दिल्यामुळे पुस्तकांचा उपयोग करण्यास वेळापव्यय होतो. धाडांच्या डायऱ्या, पारसनिसांचीं पुस्तके, राजवाड्यांची 'इतिहासाचीं साधने' वगैरे बहुतेक पुस्तकांस सूची तर नाहींतच व मोठा टाईपही विशेषनामांस वापरलेला नाहीं. कोणी इतिहासप्रेमी (रा. वेलणकर किंवा रा. गणपुले किंवा रा. आगाशे) भेटले तर त्यांस मी म्हणेन कीं, तुम्हांस कांहीं देणगी देणें असेल तर ज्या ऐतिहासिक पुस्तकांना सूची नसतील त्यांस त्या तयार करण्याच्या अटीवर मंडळाला पैसे द्या, नुसती मोघम रक्कम देऊं नका. सूची तयार करतांना केवळ नांवेंच घेतात. आडनांवावरूनही सूची पाहिजे.

यामुळें एकेक नांव दोनदां सूचींत येईल. पण अशी सूची झाली तर **संशोधकांचा** **किती**-तरी वेळ वांचेल !

५. ऐतिहासिक पुस्तकांतून **वंशावळी** दिल्या आहेत. पण त्या उपयोगी पडण्यास व्यक्तीचा जन्म व मृत्यु यांच्या निश्चित तारखा व स्त्रीचें नांव हीं त्यांखालीं देण्यांत यावीं. वंशावळ देण्याची सध्यांची पद्धत गौण वाटल्यावरून रा. ब. सरदेसाई ऐतिहासिक घराण्याच्या वंशावळीचे स्वतंत्र पुस्तक तयार करीत आहेत व त्यांत वरील सूचना अमलांत आणणार आहेत. अशा सुधारलेल्या वंशावळीमुळें कोणत्या काळीं व्यक्ति हयात होती हे कळतें. स्त्रियाच्या नांवांपुढे कंसांत तिच्या माहेरचें आडनांव किंवा जमल्यास वडिलांचें सबंध नांव द्यावे. माझ्या कुलाची माझ्या पुस्तकांत मीं जी वंशावळ दिली आहे व देणार आहे ती अशीच आहे.

६. कागद लावतांना **साधनग्रंथांची उणीव पडते.** त्यासाठीं पुण्यांतील संशोधकास मंडळाच्या किंवा केसरी–ग्रंथालयाच्या पुस्तकालयाचा तेथे जाऊन उपयोग करतां येईल. कागद निवडून छापण्यासाठीं तयार करण्यास मी काय करतों हें वै. द. खंड १ च्या २४ व्या पानांत दिले आहे. कागदास **तारखा निश्चित लावण्याचें** मुख्य काम नवीन संशोधकास प्रथमतः कठिण जातें. कारण बहुतेक कागदात **फसली सन** व **मुसलमानी तारीख व महिना** दिलेला असतो. म्हणून संशोधकानें जंत्री वापरून फसली तारीख, महिना व सन पाहून शक, मिति व इंग्रजी तारीख व सन काढण्याचा अभ्यास केला पाहिजे. तो करण्यास कंटाळा आला तर हे काम बरोबर होणार नाहीं. अशासारखा कागदास लावण्यास मला कोणी न मिळाल्यामुळे मोठी अडचण भासली. होतकरू अभ्यासकास ह्या गोष्टीचा कंटाळा वाटून तो हा उद्योग सोडतो असा माझा समज आहे.

७. ऐतिहासिक कागद **निवडून** छापण्यासाठीं तयार करण्यास **मराठींत नक्कल** सुवाच्य व शुद्ध करणारीं चागलीं माणसें मिळत नाहींत. मूळ कागदातील शब्दप्रयोग जसेच्या तसेच नकलणे, शुद्ध लिहिणे याकडे नकला करणाराचें लक्ष बरोबर जात नाहीं. यामुळे नकला मूळ कागदाशीं ताडून पाहणें जरूर होतें. हे काम करण्यास तज्ज्ञ मनुष्य रा. फफे यांच्याशिवाय मला कोणी मिळालाच नाहीं. कागदाच्या अशा अशुद्ध नकला मला पैसे देऊन करून घ्याव्या लागल्या.

८. अस्सल काहीं पत्रांवर **मोर्तब** व **शिक्के** असतात ते वाचण्यासही मला रा. फफे यांचीच मदत झाली. तसेच **जुने मराठी शब्द, जुन्या धार्मिक व सामाजिक चाली, मुसलमानांची नांवें, स्थलांचीं जुनीं व नवीं नांवे** हीं ठरविण्याची मला बरीच अडचण भासली व भासत आहे.

९. कागद वाचून समजल्यावर हा **छापण्यास घ्यावा किंवा नाहीं** याबद्दल **निवड** करतांना मी पुष्कळ वेळा बुचकळयात पडत असें.

माझी पहिले बाजीरावाच्या कारकीर्दींतील कागदांचीं दोन पुस्तकें छापून झालीं. त्यावर मासिकांतून व वर्तमानपत्रांतून साधकबाधक टीका आली आहे. पत्राची **निवड** करतांना न्या. मू. रानडे यांनीं वाडांच्या पेशव्यांच्या डायऱ्यांच्या पुस्तकाला प्रस्तावना म्हणून जो स्वतंत्र लेख लिहिला आहे त्यांत ऐतिहासिक पत्रांचे प्रकार दिले आहेत. इतिहास म्हणजे लढायांचीं वर्णनें, राज्यक्रांत्यांचीं वर्णने असा सामान्य लोकांचा चुकीचा समज आहे. पुढील विषयांचा न्यायमूर्तींनीं त्यांत समावेश केला आहे : १ लोकस्थिति, २ समजुती, ३ राहणी, ४ भरभराट, ५ सुखोपभोग, ६ चालीरीती, ७ नीति, ८ राज्यपद्धति,

९ जमीनधारा, १० वसुली, ११ किल्ले, १२ कर, १३ अखबारी, १४ खंडणी, १५ सायरबाबी, १६ फौजउभारणी, १७ नोकरांचे पगार व करार, १८ बंदरसंरक्षण, १९ कर्जउभारणी, २० न्यायखातें, २१ फौजदारी खातें, २२ टपाल, २३ नाणीं, २४ तुरुंग, २५ सनदापत्रें, २६ धार्मिक देणग्या, २७ पेन्शनें, २८ इमारत खातें, २९ जमाखर्चपद्धति, ३० औषधपाणी, ३१ स्वच्छता, ३२ आयात व निर्गत व्यापार, ३३ विद्याखातें, ३४ समाजिक सुधारणा, ३५ शेतकी, ३६ भाषापद्धति वगैरे.

माझ्या कागदाची निवड बहुतेक या विषयांस धरून केली आहे. माझ्या दोन पुस्तकांवर कागदांच्या निवडीसंबंधीं टीका आली आहे ती वाचून मला वाईल वाटलें नाहीं. कारण मीं उद्देशाशिवाय कागदाची निवड केलीच नाहीं. टीका करणाऱ्यांस उद्देश न कळल्याने त्यांनीं तशी टीका केली आहे. जुन्या कागदांचें महत्त्व आपल्या अध्यक्षांस चांगलें कळतें. माझ्या कागदांत कांहीं निरुपयोगी कागद काढले होते ते मी जाळून टाकणार होतों. रा. दत्तोपंत मला म्हणाले, ते मला द्या म्हणून मी त्यांना २ खोकीं भरून कागद दिले आहेत. त्यांतही त्यांस कांहीं उपयुक्त कागद सांपडतील. नाहीं कोणीं म्हणावें ?

१०. कागदाच्या व छपाईच्या महंगेतमुंळ सध्यां प्रकाशनास मोठीच अडचण उत्पन्न झाली आहे हे सांगणें नको.

*No. 1* ] श्री अ. आषाढ व. ५।१६५५

जून २१।१७३३

तीर्थस्वरूप राजश्री **रामचंद्रपंत करकरे** काका दि। **विश्वनाथ वैद्य**

वडिलांचे सेवेसी.

अपत्ये समान **विठल गणेश प्राणी** कृतानेक [1] विनंती ता।। अधिक आषाढ वद्य ५ मुकाम **सासवड** आम्हाकडील वर्तमान तरी तीर्थरूप मातुश्री बाई वद्य तृतीयेस मंगळवारी देवआज्ञा जाहाली. त्यांच्या अस्ति **अनंतभट तेलंग** ब्राम्हण याजबरोबर **घोमास** कृष्णेत टाकावयासि पाठविल्या आहेत. त्यास बरोबर येथून माणस द्यावा तरी माणस नाहीं. यास्तव वडिलास लिहिले आहे. तरी आपण **धोमा**पावेतों येक माणस देऊन श्रीकृष्णेंत टाकवाव्या. **धोमांत** कोणी आपला ब्राह्मण असेल त्याजकरीव संकल्पयुक्त टाकवाव्या. सेवेसी कळावे. तीर्थस्वरूप रा। **धोंडोपंत** काका यास पत्र लिहिलें आहे. ते मेढ्यास पावते करावें. बहुत काय लिहिणे कृपा करावी हे विज्ञापना.

**धोमांत श्रीकृष्णेंत** टाकावयासी तेथे खर्च रुपया दोन रुपये लागले तरी आपण द्यावे. मी मग रु।। पाठवून देईन. **धोमांत** आपले स्नेही ब्राह्मण आहेत त्यास लेहून तेथें विधिपुरस्कर टाकवाव्या, हे विज्ञापना. मातुश्रींचें सार्थक जाहलें; परंतु ईश्वरें आम्हांस नाहींसारिखी केली. आज पाच सात महिने बरे वाटत नव्हतें. त्याच वेथेनें देवआज्ञा जाहाली. उपाये बहुत केला; परंतु इलाज चालिला नाहीं. **मेढ्याचें** पत्र पावते करावे. हे विज्ञापना.

Ramchandra Gopal Karkare is asked by Vithal Ganesh Prani of Saswad to help Anant Bhat Telang to take to Dhom the bones of his dead mother in order to merge them down into the river Krishnabai.

---

*No. 2* ] श्री २९ जमादिलावल

कार्तिक शु. १।१६५५

आक्टो. १६।१७३४

श्रीमंत **सेनासाहेब सुभा**

कबज वसूल बाो **बाबाजी भालेराऊ** नौकर सरकार दिमत **राणोजी गोरे** सु।। सन खमस सलासीन मया आलफ. कारणे कबज लिहून दिधली

---

[1] सुतक असल्यामुळे नमस्कार लिहिला नाहीं.

यैसीजे, आपणास सरकारांतून नालबंदी[1] देविली बमारफात[2] रो **विश्वनाथ वैद्य.** रु॥ १०० सेंभर आपण भरून पावलो. हे कबज लेहून दिधले सही.

बि॥ **आपाजी भीमराऊ** ता॥ छ २९ माहे जमादिलावल

नि॥ कट्यार

A receipt given by a servant Babaji Bhalerao of Ranoji Gore to Raghuji Bhosle for a sum of Rs. 100 paid to him as Nalabandi through Vishwanathbhat Vaidya.

---

*No. 3* ] श्री का. शु. ११।१६५६

आक्टो. १६।१७३४

कबज वसूल बो॥ **दुर्गोजी** वा॥ **आकोजी घोरपडे** नौकर सरकार श्रीमंत **सेना साहेब सुभा** सु॥ सन खमस सलासीन मया अलफ कारणे कबज लेहून दिधली यैसी जे, आपणास नालबंदी स्वाराबद्दल देविली. मो॥ रु॥ १६०० सोलासे. सदरहू रुपये बमारफात रोश्री **विश्वनाथ वैद्य** रुपये भरून पावलो. हे कबज लेहून दिधले सही छ २९ माहे जमादिलावल

बि॥ **आपाजी भीमराऊ**

नि॥ कट्यार

A receipt of Rs. 1600 for Nalbundi paid by Vishwanathbhat Vaidya to Durgoji Valad Akoji Ghorpade, a servant of Senasaheb Subha.

---

*No. 4* ] आश्वीन १६५७

सपटंबर १७३५

पहिला बंद महाल

२

उपरी—यैसें बोलिले. यानंतर वरकड राउतास व जमानास ताकीद वरचेवर होतच आहे. त्यास तुम्हाकडे कोण गेले, कोण राहिले तें लेहून पाठवणें व ताकीद कोणकोणास करवावी, तेथें हातचिठ्या कोणकोणास काये पाहिजेत, तो मसुदा करवून पाठवणें. काल संध्याकाळीं रा॥ **नागोबाची** व वरकडाचीं पत्रें आलीं,

१ युद्धतयारीसाठी दिलेले द्रव्य. २ हस्ते, मारफत.

त्यावरून रा। **देवराव** यांनीं सांगितलें जे, शनवारीं जमाव **चिपळुणास** गेला मग **नागोबानें** निवड करून **भास्करबावास** समागमें घेऊन व राजश्री **रामाजीपंत** यैसे **काळिस्तेवर** गेले. **गोवळांतील** किलेदार मेला, त्या मोबदला दुसरा मराठा किलेदार आला आहे. याणीं जाऊन आगाज[1] केले, त्यांनींही आंतून तोफा सोडल्या. हाली झाड तोडावयास लागले आहेत, यैसें सांगितलें. मग मजकडे पुसिलें जे, हें आहे कैसें? यानंतर मी येकांतीं सांगितलें जे, खाले जातांच बावांनीं चारसें माणूस घेऊन **काळिस्तेवर** गेले. कामकाजास लागले आहेत. लोकांची भर थोडी; त्यांहीमध्यें **जाधव, भोइटे** निघोन येताहेत, हें सांगितले. नंतर तमाम लोकांस ताकिदी जाहाल्या. **जाधव, भोइटे** यांस हातचिठ्या पाठविल्या; आण **सचिवपंता**कडील जमाव पुसावेया लागले. मागती म्हणावेया लागले जे. **चिटकोबा** येथें काय करणार? याणेच जावें. लोक कोणी जुडत नाहीं. मी सांगतच होतों जे तुझे जाणेचें काम नव्हे. हे लोक लबाड. कोणी सांगितले न आइके. सेवट तेच जाहालें. आण भ्रमामध्यें पडला आहे. याप्रकारें फिकिर बहुत करितात. सेवेच मजकडे मागती पुसो लागले जे, राजकारण आणले होतें तो विचार कैसा आहे? त्यास आपण उत्तर दिलें जें, आलें होते खरेंच; परंतु किलेदार मेला तेथें घालमेल जाहाली असेल. त्याही-मध्यें ज्याकडू (न) राजकारण आले. त्यास बोलाऊ पाठविला होता तो येऊन भेटलेनंतर होईल मजकूर तो लिहितील. दुसरें **महारा(जां)नीं** सांगितलें आहे जे, आपले जों कामकाज होई तों मुलुकामध्ये उपद्रव न करावा. सध्यां **आंगरेचे** वैमानस होऊन कामास धका बसेल, याविसी पत्र ही लिहविले असे. तुम्ही आपलें वर्तमान व मुजरद माणूस आम्हाकडे यावें यैसा पाठवित जाणे. बहुत काये लि॥

---

३

पुरवणी तीर्थरूप राजश्री दादा वडिलांचे सेवेसी.

विनंति उपरी–घरचे वर्तमान तर सर्व सुखरूप आहेत. नवी जर्दी घोडीस गलेस कांहीं दुख जाहले. औषध उपाव करितों. बरी होईल. बागेमध्ये खालील विहिरीस पाणी लागले. आणिखी फोडावी लागती त्यास धोंडा लागला; परंतु फोडवितो. ॥ **नागोजीराव पाटणकर** या कडील बेलदार दोन आले; परंतु माणसें न

---

[1] गवगवा, बोभाटा.

आलीं. दीपवाली जाहालेनंतर सूत्री लागेल. मटाकडून अद्याप पैका आला नाहीं. दीड हजार रुपयेची चिठी **विश्वनाथ जोसी चिपळूणकर** यांची दिली. ते प्रतिपदेस रुपये देतील. रा **रत्नाकरपंत** दोन हजार रुपयेस कूल बरें आहे. आपा दरम्यानें आहे. लौवकर देणे, नाहींतर मग बावांचा बोल लागेल. येैसे म्हणतो. त्यास तुम्हाकडील उतर न आलें. मागती त्यांणीं आग्रहसा केला तर यांपैकीं येक हजार रुपये त्यांचे निसबतीने देविती. बंदुकी विसी मागा येक दोन वेळा लिहिलें, त्याचा शोध केला. त्यास **अनतोजी राणा** याजकडेच आहे. **संकराजीच्या** भावाजवळ दिली नाहीं. तुम्ही वरचेवर पत्रे पाठविणें. रजै पाठवावी, त्यास माणूस मुजरद नाहीं. मागाहून पाठविती. बहुत काये लिहिणें हे विनंती. **विठल भिकाजी** याचा परामृश करणे हे विनंती.

हे॥ सेवक **नारो भिकाजी** कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपरी. सेवेमध्यें येकनिष्ठ राजश्री **विश्वनाथबावांचे** आज्ञेत आहे. चिरंजीव **विठोबाचा** परामर्ष करणार स्वाम वडील आहेत. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

The first paper is missing. The remaining two give the details of previous preparations & movements of the armies for the invasion of Gowalkot.

---

*No. 5*] श्री **छ २२ साबान**
**पौष व ९।१६९७**
डिसे. २६।१७३५

वेदमूर्ती राजश्री **विश्वनाथ भट वेद्य** स्वामीचे सेवेसी

विनंती **शंकराजी बल्लाळ** सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ता॥ छ २२ शाबान पावेतों मु॥ **माची महिनतगड** वर्तमान येथास्थित आसे. विशेष राजश्री **भास्कर बावांनीं** आम्हांस **महिमतगडास** रवाना केलें. येथे राहोन खालिशाचा अमल वसूल घ्यावा, त्यावरून **महिमत**गडास आलों येथील पूर्वीचें वर्तमान **गणोजी पवार** याबा॥ सविस्तर लिहून आपणाकडे पाठविले होते. त्यास आलीकडील वर्तमान राजश्री **यमाजी पंतास** येथील हवालदार सुभेदार यांणीं पत्रें लि॥ होतीं. त्यांणीं जाब पाठविले कीं त्यास गडावरी आगर [1]घेरियांत राहो न देणें. आमल चालोन देणे, उटवून खालीवर ते घालवणें. येसीं पत्रें आलीं त्यांस सुभेदार यांणीं आम्हांसी कजिया लाविला आहे.

---

१ किल्याच्या भोवतालच्या प्रदेशात.

**आंगरियाहून आगऱ्या**अधिक **येमाजीपंत** निर्माण जाले; महाराजांचे हुकमास मनाचिठी **येमाजीपंताची;** नदीचे पाणी उफराटे चालिले; महाराजांचा हुकूम न मानीत. आंगरे मवास[1] जाले, त्यापेक्षां **सातारियांत** घरातच हुकूम मोडूं लागले; आतां काय राहिलें? नाना प्रकारच्या बकव्या[2] करितात. **कृष्णाजी वामन** सुभेदार याजवळ **बाजी बल्लाळ** कारभारी आहे. तो म्हणतो राजा कोठें आहे? हातचिठ्या घरोघर जाल्या आहेत; कोण मानितो? **गोवळकोट** राजा घेईल तेव्हा हाबसीपटी राजा घेईल येसे म्हणतो; आणि **आंगरिया** हाबसीपटी याचे मामालेयान घेतो त्याचे काहींच नव्हे. हुजूरच्या आमलास खलेल करितात; आंगरियाकडे आमल लिहितात, याचा आंमल चालो न देणें, बरातदार मुलकांत जातील ते धरून नेणें. राजयाने काय करणे आहे? असे कितवे करितात. आम्हांस कांहीं मामल्याचे सुख दु:ख फारसे नाहीं. परंतु आधीं हें कर्म करूं नये. महाराजांचा खालिशा आमल मुलकांत सनदा पत्रांचा (चा)लिला. महाराजांचे सिके महालोमहाल गडकिल्यांस लागले. आणि ते सिके महाराजांचे न चालत; बकव्या करितात. **आंगरिया** मवास असो; परंतु दरबारचे कारकून चालों नेदीत. आम्ही केवळ नामर्द जालों. तुम्ही नामर्द जाहलेस. येसे तुमचे वस्तु नव्हे. तरी कशास **महाराजांचे** सिकयाचा वधा करीत होतेस? याउपरी आंगरियाकडील दावा कबूल केला, परंतु महाराजांस सविस्तर वर्तमान विदित करून सुभेदाराने चिठी अमान्य केली आहे, याचे पारपत्य कराल तरीच मामला सुरळीत होईल. यामुळे हा मामलाच अगदीं त्यांनीं टाकिला तरी कबूल करावा. येथील रु॥ जे जिलेदारास पावतात ते महाराजांचे पोत्यास ठेऊन पेस्तर सालचे लाविती. जिलेकडील रु॥ व खालिशाकडील रु॥ मस्ताच महाराजांचे पोता लाविंतों. सालमजकूर तो सारा वसूल झाडेनिसीं त्यांणीं घेतला. ये गोष्टीची बोली महाराजाजवळ विदित करणे आम्हास बोलवाल तरी येतो. येक निस्टा याचा करावा लागतो. महाराजांस विज्ञाप्त लिहिली आहे; व मुजरद **भिमाजी रंगनाथ** पाठविले आहेत. सविस्तर विदित करून पारपत्य × × उतर पाठवावें. नाहीं तर राजेयाचे सिक्क्याकरितां आम्ही परिछिन येथे मरतों. कळले असावें हे विनंती.

Shankaraji Ballal writes to Viswanath bhat from Mahematgad the difficulties of collecting the revenue created by Yemajipant who defies the orders of Chhatrapati He is encouraged by Subhedar Krishnaji Vaman & his administrator Baji Ballal

---

१ लुटारूंचा नायक. २ गोंधळ.

*No. 6* ] श्री चैत्र शु. ७।१६५८
मार्च ८।१७३६

वेदमूर्ती राजश्री **बाळंभट** व ता। राजश्री **विश्वनाथ(भ)ट** स्वामीचे सेवेसी. **याप्राति विश्वनाथ जोशी** नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता। चैत्र सुध सप्तमी **जाणून** स्वकीये कुशल लिहीत गेलें पाहिजे. आमचे वर्तमान आपले कृपेकरून **सुखरूप आसो** विशेष. श्रीमंत राजश्री **रघोजीबावांनी** थोडा बहुत यैवज देविला आहे. तो **मागाहून सत्वर** पाठऊं. सदैव पत्र पाठवून परामृष करित गेलें पाहिजे. बहुत काये **लिहिणें** कृपा लोभ असों देणें हे विनंती.

Vishwanath Joshi probably Chiplunkar writes to Vaidya brothers that Raghuji Bhosle paid some amount which will be sent shortly, His name is mentioned in the letter of September 1935.

---

*No. 7* ] श्री अ. आश्वीन व. १।१६६०
सप्टंबर १७ रविवार १७३८

पा। आश्विन वद्य ५ अधिक

श्रीमंत राजश्री **बावा** स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक **संकराजी कानो** सिरसाष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील **वर्तमान** ता।। अधिक आश्विन वधी प्रतिपदा रविवारपर्यंत समस्त सुखरूप आहेत.- **वरकड** वर्तमान राजश्री × × × कोकणांत गेले. **जांभलीस तुलबाजी मोरे पाठविले होते. ते रसद** रु।। १०० एकसें आणिले. त्यां(त) खरे ८५ पंचाशी बटी- **याचे** १५ पंधरा त्या(स) बटा एक रुपया पडतो. ते रुपये **दामले** याचे दुकानीं मांडून **ठेविले आहेत. राबते महार** दोन व पायपोसाचा जोडा एक 'व पाटील कुलकर्णी **पेरणी** जाहालियावरी येतो म्हणून लि।। तो कागद ब जीनस स्वामीकडे पाठविला' आहे. **संभाजी राणा** यास पाठवणें म्हणोन लि।, तरी त्याचा शोध केला. परंतु **कोठे न सापडे. पुणे**याकडे गेला यैसे बोलतात. पहिले पत्र आले होतें, पंचवीस रु।। **घेणें.** त्यावरून **एक मोहोर** व अंगावरील सकलात यैसे घेतलेवरी बाकी पैका मेलवावया गेला.

❈ ❈ ❈ ❈ ❈

तो × × एक महिना पाहतो. **आपाजी पंता**पाशी सांगितले आहे. त्यास **पुसणें** तो सांगेल. त्याप्रमाणें बेगमी केली पाहिजे. कोकणांतील पत्रें लवकर **पाठवणें. जनार्दन देवाचें** पत्र घेणें जे, राजश्री **बाबाकडे** गांव दिला असे, यैसें घेणें. त्यासी गावकरांनीं इरेस घातले असे. आपणास कळावे म्हणून लि।. माझी चिंता असो दिली **पाहिजे हे** विज्ञापना.

लासुर्णे येथील देखरेख करणें म्हणून आज्ञा करितां आपली सनद पाठवणे जे याचे रुजूवातेनें कामकाज करणें. यैसें पत्र.

Sankaraji Kano writes to Vishwanath bhat an account of his work. He was a clerk in the employ of Vaidyas. Tulbaji More, Ganeshpant Damle, Sumbhaji Rana, & Janardan Deo are mentioned in letter No. 51 of supplement to Vol 1.

---

*No. 8*] श्री श. १६६०
स. १७३८

श्रीमंत राजश्री **भास्करबावा** स्वामीचे सेवेसी

पोष्य **कृष्णाजी तानदेव साठे** माहाजन **बुरंबाड** कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी श्वामीनें रो माहादे वी याजबो पत्र ग्रामस्थास पा। ते पावले. अर्थ कलला.
× × × स्त अवघे जयगड × × × न आलिया उपरी
× × × × चे मते काय × × × × स लिहितील. सर्व × ×
× × आहेत या उपरी धंद्या × × × आपणास विनंती केली होती त्यास रा। × × भट मामा तेथें गेले आहेत. त्या बराबरी सांगोन पाठवावे चिरंजीव पाठविला जाईल. सर्व प्रकारें सांभाळ श्वामीस करणे लागेल. विशेष काय लिहावे सुज्ञ आहा. कृपा निरंतर वर्धमा(न) कीजे हे विनंती.

Krishaji Tanadeo Sathe Mahajan of Burambad writes to Bhaskarbhat Vaidya requesting to give some employment.

---

*No. 9*] श्री तिसा सलासीन
फाल्गुन शु. १६६०
मार्च सन १७३९

यादी मोईन[1] पोस्त[2] सिमगा सु॥ तिसा सलासैन मया आलफ आदा

।. रा। **नानाकडील** खिजमतगार.
॥. रा। **पंतसचिव** चोपदार
रा। **पंतसचीव** याजकडील
१ खिजमतगार.

---

१ ठराव. २ बक्षीस.

·।।· वली महमद
१ भोई
रा। स्वामीकडील
२ खिजमतगार
२ चोपदार
·।।· हुकेबारदार
१ जामदार

The names of servants of Peshwe, Sachiv & Shahu to whom Vaidyas gave tips for Shimga.

---

*No. 10* ] श्री श्रावण व. १३।१६६१
ऑगस्ट २०।१७३९

हिसेब नि।। हरबाजी नाईक सु।। आर्बैन मया आ (ल) फ
इ।। ता। श्रावण वद्य त्रयोदसी जमाखर्च रु।।

| जमा श्रावण मास रुये. | खर्च रुये |
|---|---|
| १२ गु।। संकरापा नाईक आ। मि। श्रावण वध्य ६ | ६।।= खा।तूप गु।। सिदराम मुजुमला |
| २ गु।। मिराखान दि।। आंगरे मि। श्रावण सुध्द १४ | ८= खा। जोडा भिकूस |
| १६७।। गु।। तोरापा नाईक आ। श्रावण वध्य २ | ४ दि। तुलाजी आंगरे ता। २ धाकोजी २ लाडकोजी ४ |
| १५ गुजारत बाबूराव रघूनाथ दि।। सरलस्कर मि। वद्य ४ | १२ बा। रामजी चवाण चार बा। आ।। |
| १६० गु।। गोविंद राउ सितोले मिं। वध्य ७ | ३।। श्रावणीस खर्च |
| ३०। गु। यादव गिरभाजी मि। वध्य १० | २ देणें बाबुराव वाटदकर देवरुखे बा।तूप आ।।२ ये। |
| ३८६।।। | ७ सदासिव तांबट |
| | २५ मोरोपंत दामले मि। वद्य प्रतिपदा संभराचे भरतीस |

३ रामराव सोंमवंसी कर्ज रुाये
२५ पैकीं दिल्हे.

१०० आप्पाजी भिकाजी दि॥
रत्नसाल मि॥ वद्य ३

४ बाबूराव रघुनाथ दि॥ सरलस्कर

॥।‑ घरांत खर्च दक्षणा बाइकाकडे
चतुर्थीस

।· सखूबाई

॥· उमाबाई

८‑ हजामत विश्वनाथभट वैद्य

१ कृष्णाजी पाटील ब्राह्मणपुरकर

६८‑ सौ। उमाबाईकडे मि। वद्य ६

२ सोमवारीं दक्षणा

॥· सौ। उमाबाई

८‑ लक्षुमी

१८= धर्मादाये दिखीत आा २

।· सखूबाई

८‑ भिकूबास

---

२

१ महादे ( व ) भट अग्निहोत्री
निवंडीकर

२५ मोरोपंत दामले मि। वद्य अष्टमी

॥= माला बांधावयास ता। अकल
महमद.

८‑ रेसीम गिरीकडे

१५० सकराजी प्रभु दि॥ रत्नपारखी

८॥· भाजी व सुया

८‑ सखूबाई दक्षणा कृष्णे (स)

८॥· भाजी मेथी

८८ मध मुलाकडे
सौ। उमाबाई श्रावण वद्य ११
येका(द)सी
८॥· हजामती पोरगे २
८।॥· हजामत बाळंभट
८= सौ। उमाबाई
८। खा॥ बाळ्या सौ। सरस्वतीबाई
सोनें व(ज)न पावणेसात मासे
गुंज उणे ये॥रु।

३५४८=।

३६२।=॥
बाकी रु॥ २४।-॥

This is an account submitted by Harbaji Naik. It contains names of managers i. e. दिमत of wellknown persons.

---

*No. 11* ] श्री कार्तिक वद्य ३।१६६१
नोवेंबर ७।१७३९

राजश्री **विश्वनाथ भट** वैद्य यांस

**सौ. राधाबाई** नमस्कार विनंती उपरी श्रीमंत राजश्री **पंतानीं** तुम्हाकडून रुपये ५०० पांचशे देवीले ते आम्हांस पावले. कार्तिक वद्य त्रितीया

This is a receipt of Rs. 500 given by Soubhagyawati Radhabai a relative of PantSachiv or Bhor, to Vishwanathbhat.

---

*No. 12* ] श्री पौष शु. ४।१६६१ रविवार
डिसेंबर २३।१७३९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री **विश्वनाथबावा वैद्य**
स्वामीचे सेवेसी

पो। **कृष्णाजी हरी साठे** कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असावें. विशेष. आपण पत्र **फिरंगोजी**

वा। पाठविलें तें पावलें. लि॥ वर्तमान कळलें. त्यास राजश्री **रामचंद्र गोपाळ सेणवी** तो येथें दोन रोज तुमचीं पत्रें आलियात्रर होते. त्यास त्यांनीं श्रीमंत……… ……… **पंतास** उतर लेहून पा॥ होतें. त्याचा जाब आलियावर फडशा होईल म्हणोन आम्हांस सांगोन लस्करांत गेले. त्यावर राजश्री **पुंडलिक नाईक रास्ते** यांचे गुमास्ते यांनीं त्यांजकडे पत्रें पाठविलीं होतीं. ते आलियावर जाबसाल सांग्येतोंवर **फिरंगूस** ठेऊन घेणें, म्हणोन त्यांणीं सांगितलें. त्यावरून ठेऊन घेतला. त्यास आज पौष शुद्ध ४ रविवारीं त्यांचा जाबसाल आला. त्यामध्यें रा. **पुंडलिक नाईक** यांणीं लिहिलें आहे कीं, आम्हीं येथें राजश्री **वैद्य**बावाजवळ करार केला आहे कीं, दाहा हजार येथें वाईतच द्यावे; बाकी पंधरा हजार रु॥ तुमचे कुळाकडून येतील तैसे तैसे **कृष्णाजी हरीचे** दुकानीं भरणें; यैसें त्यांणीं आपले गुमास्ते यास लेहून पाठविलें. तेंच बाजिनस पत्र त्यांणीं आम्हांस दाखविलें, आणि सांगितलें जे, पंधरा हजार रु॥ आंमचे येतील तसतसें महिना पंधरा रोजामध्यें देऊं. ते घेऊन जमा करावे, आणि कबज द्यावें. याप्रा॥ त्यांणीं सांगितलें, त्यावरून **फिरंगूस** आपणांकडे पाठविलें आहे. रा॥ **नानाजी ना॥** यांचे घरीं एक रोज बैसविला होता. आम्हींही फार तगादा केला. आपलें पत्रही निकडीचेंच होतें. परंतु (अपूर्ण)

Krishnaji Hari Sathe a banker informs Vishwanathbhat that the money due from Ramachandra Gopal Senavi & Pundlik Naik Rast can not be recovered just now & their letters are sent for perusal.

---

*No. 13*] श्री **पौष शु. ४।१६६२**
डिसेंबर २३। १७४०

पुरवणी रा॥ **लक्ष्मणपंतास** नमस्कार. **पुंडलीक ना॥** मार्फातीची हुंडी आद्याप आली नाहीं. आली म्हणजे रु॥ देतो. **सिवराम तुकदेव** यास रु॥ ५००० पाच हजार दिल्हे. खत त्याचें देईल तें मागाहून पाठऊन देतो. **चिंबलकराचा** ठिकाण लाऊन रु॥ देईल तर घेतो. **विसोबा नाईक सहस्त्रबुद्धे** याज बा॥ रुपये १७२६ आध्याप न आले. त्याचे येथें कोणीच नाहीं. **सातारियास** ते गेले आहेत. तेथें शोध करून रु॥ फडशा करून घेणें. यानंतर पंधरासे रु॥ हुंडी पाठविली. **जिवापा नाईकावर** ते रु॥ आर्कटी रु॥ घेतले. कळलें पाहिजे. बहुत काये लि॥

उबरे याचे चुनखड्याविसी ताकीद पा॥ आहे. घेणें, व **सिवराम तुकदेव** याचें

खत ही हालींच पा। आहे, तें घेणें. कळलें पाहिजे. रुा ५००० बिनसूट आठ आणे प्रो लेहून घेऊन पा। आहे, हे विनंति. गुराखी यास रुा १ दिल्हा आहे, तो आमचे नांवें हिसेबी लिहून ठेवणें आम्ही तुमचा जमा केला असे. लोखंड इंग्रेजी–लोखंड रुा ११ घेऊन पाठविलें आहे. कळलें पाहिजे. चंबू २ मार्गे पा। आहेत. घेणें. लोखंड घेऊन ठेविलें आहे. कोणा बा। मागाहून पाठवितो. हे विनंति. हाली पाठविलें नाहीं. हे विनंती.

A supplementary letter to Laxman Ballal Joshi. He expects money from Pundalik Naik Raste. Rs. 5000 are paid to Shivram Tukadeo. His deed for the sum will be sent afterwards. Money from Chimbalkar & that from Visoba Naik Sahasrabudhe are not received yet. Jiwappa Naik paid the money. English-make iron is bought & will be sent with some person afterwards.

---

*No. 14* ] श्री १६६१ १७३९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
कृष्णाजीपंत साठे स्वामी गोसावी यासि.

पो विश्वनाथभट वैद्य कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. यानंतर तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री पुंडलिक नाईक रास्ते याची चिटी पाठविली होती ती फिरली. ती‑कावारी पाठविली. ती पावली. राजश्री परशराम ना। आनगल यांची वीस हजाराची हुंडी होती, त्यास आरकट न घेतां आठ दिल्हे. त्यापैकीं माहादोबा ना। दामले यांनीं अटीचे रुा दाहा हजार दिल्हे. बाकी तुम्ही दिल्हेत, म्हणोन लि।, तें कळो आलें. राजश्री आपाजी ना। दि नानाजी ना। जोशी यांणीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं सविस्तर वर्तमान कळो आलें. त्यांणीं रा। हैबतराव सुभेदार याकडून पेशजी साडे सा हजार रुा आम्हांस देविले होते, त्यापैकीं सा हजार सुभेदार यांणीं आम्हांस दिल्हे होते. पाचसे दिल्हे न होते. त्याविसी त्यांसही लिहिलें होतें. त्यास त्याहीं प्रत्योत्तर दिल्हें नाहीं. आम्हांस आपानें लिहिले होतें कीं, नानाजी ना। याचें पत्र तुम्हांस आलें आहे, तें व हैबतराव यांचा जाब पाठवून देणें, म्हणजे व्याजसुधां रुा। देऊं. त्यांस पत्रें पाठविलीं आहेत व हिशेबही करून पाठविला आहे, तरी हिसेबाप्रा। रुा। देतील तर घेणें. नाहीं तर जोसी यासि आपाचें पत्र घेऊन पाठवून

देणें कीं, आम्ही रु. दिल्हे नाहींत. तुम्ही वारून देणें. पैसें घेऊन पाठवावे व **हैबतराव** याचें पत्र **नानाजी ना** यासी घेऊन हाली पाठविलें आहे व **नानाजी ना** याचें पत्र **नारो अनंत** याचे नावाचें पा आहे. यैसीं तीनीं पत्रें व हिसेब यैसें माघारे पाठऊन घ्यावें. रुा हिसेबाप्रा देतील तर, हिसेब कागदपत्र त्यास द्यावें. राजश्री **माहादाजी बलाळ सहस्त्रबुधे** याकडे आमचा यैवज येणें, त्यापैकीं राजश्री **गोविंद ना दातार** याकडून रुा ३००० तीन हजार आम्हास देविले. त्यास **नाइकाचें** पत्र आम्हास आलें कीं, सांगाल तिकडे जमा करून देऊं, त्यास आमचें व **दातारांचें** खातें आहे. त्यांस लिहिलें आहे कीं, तुम्हांस गरज असेल तर ठेवणे, नाहीं तर तुमच्या दुकानीं जमा करून देणें. त्यास त्यांणीं ठेविलें तर ठेवितील, नाहींतर ते तुम्हांकडे जमा करून देतील. तर सदरहू तीन हजार रुा जमा करून द्यावे, मिती आम्हास लिहोन पाठवावी. त्ये मितीचा जमाखर्च करू.

Vishwanathbhat writes to Krishnaji Hari Sathe that (1) Pundalik Naik Raste's chiti ( note ) to pay money is refused & hence returned (2) Parasharam Naik Angal was to be paid 20000, but he was not willing to take Arcot coin, hence he was paid Ati coin (3) Mahadoba Damle paid Rs. 10000 & you paid the remaining (4) Nanaji Naik Joshi paid 6 thousands through Haibatrao (5) Mahadaji Ballal Sahasrabudhe paid Rs. 3000 through Govind Naik Datar.

---

*No. 15* ] १६६१
१७३९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री **विश्वनाथ बाबा**
स्वामींचे सेवेसी

पो **कृष्णाजी हरी** कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वानंदलेखन करीत असावें. विशेष. आपण पत्र **देवजी जासुदा** बा पो तें पावलें. लिा मजकूर कळों आला. त्यास **वा हरभट केळकर** यांजकडे पाचसात वेळा शाहाणे माणूस पाठविलें, त्यास ते म्हणतात कीं, यैवज येईल तेव्हां देऊं. तूर्त यैवज नाहीं. वर्षापुढें व्याज देऊं, यैसें सांगतात. ते थोर ब्राह्मण. त्याजवळ अधिकोतर बोलतां नये. आमचा उपाये काय ? राा **बाबूराव कोनेर** याणीं तो च्यार वेळ तुम्हास उतरे लिा. ते कांहीं रुा येकंदर देत नाहीं. बेमुर्वत घेणेंच तर **सखोर्जास** पाठऊन द्यावा. दारीं बसऊन घेऊं. केवळ आम्ही माणूस बसविल्यास वाईट दिसतें. यास्तव लिा आहे. त्याप्रोच **नानाजी ना जोशी** देऊंदिलाऊ करितात; परंतु देत नाहीं. विना खरमरा

गडी **सखोजी** किंवा कोणी दुसरा देसचाच मराठा येईल, तेव्हां हे रुा देतील. आम्ही माणसें दारीं बसवावीं तरी अमलसें विपर्यास प्रकार दिसतो. यास्तव येक गडी च्यार रोजाचे अवकाशें पाठऊन द्यावा. वो राजश्री **शंकर भटानीं** रुा दिल्हे. मितीवार हिसेबच आलाहिदा उतरून बंदावर पाठविला आहे. तो रुजू घाढून जमाखर्च करावयाचा असेल तो करावा. यानंतर राजश्री **केसोपंत वैद्य** आम्हास म्हणाले कीं, आम्हास पंचवीस हजार रुा गरज आहे. वाईहून पत्र आणवा म्हणाल तर आणूं. किंवा तुम्हीच घ्याल तर देणें त्यास आम्ही सांगितलें कीं, यैवज देतो. मग जिकडे लावणें तिकडे लाऊं. त्यास राा **सदाशिव नाा रास्ते** यांणीं सात हजार रुा। तुम्हाबदल भरिले. त्यास तुमचें पत्र होते कीं, आमचे दुकानीं भरावे. त्या पत्रावरून रुा। घेऊन जमा केले. ते परभारे राा **केसोपंतास** दिल्हे आहेत. बाकी ही पंचविसाचे भरीचा ऐवज दो चौ रोजा देणार. त्यास तुम्ही आमचे जमा धरून त्यांचे नावें लिहित असाल तर जमाखर्च करून आम्हास लेहून पाठवावें, व त्यासही एक पत्र लि। जे, तुम्ही रुाविसी रा. **कृष्णाजीपंतास** हटकिले त्यावरून आम्ही तुम्हास रुा। त्याकरवीं पंचवीस देविले आहेत. घेऊन जमा करणें, यैसें लेहून पाठवावें आणि तुम्ही जमाखर्च करणार नसिला तर तैसेंच लेहून पाठवावें. यैवजाची गरज असिली तर अगोदर आठ चार (रोज) लेहून पाठऊन मग चिटी करावी. वरकड सविस्तर वृत्त येथास्थित असे. दरबारचेही सविस्तर वृत्त येथास्तित असे अधिकोत्तर ल्याहावे यैसें नाहीं. यानंतर राा **माहादाजी नाा निंबालकर** यांचा मजकूर. त्यांस मुजरद आमचा संकरूच लस्करांत पाा आहे. त्याबाा त्यांचा हिसेब व तुमचें पत्र व राो **दिनकरपंत** यांचें पत्र यैसें दिल्हें आहे. बेमुरवत दारीं बसोन फडशा करून घेणें, यैसें सांगितलें आहे. राो **दिनकरपंत** लस्करांतून आठ रोज फिरोन आले होते. त्यांस ही हें वर्तमान सांगितलें. त्यांणीं कबूल केलें आहे कीं, मी लस्करांत जातो आणि बेमुरवत रुा। त्याकरवीं देवितो. त्याजवळ **निंबालकराचा** हिसेब होता. तो देखील काढऊन लस्करांत न्यावयास बाा घ्यावयाचा करार केला. तेही लस्करांत गेले आहेत. **संकरू**ही शाणा गडीच आहे. आठ रोज लस्करांत रवाना करून जाले आहेत. तिकडील जाबसाल आलियावर पाठऊन देऊं. वरकड सविस्तर येथास्तित असे. बहुत काये लिहेणें. कृपा निरंतर लोभ असो दीजे हे विनंती.

Krishnaji Hari Sathe writes to Vishwanathbhat in detail an account of the realisation & disbursement of money from different persons such as:— Harbhat Kelkar, Baburao Koner, Nanaji Naik Joshi, Shankarbhat, Kesopant Vaidya, Sadashiv naik Raste, Mahadaji Naik Nimbalkar, Dinkar Mahadeo etc.

No. 16 ] श्रीभवानीशंकर १६६१ / १७३९

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

**विश्वनाथभटबावा** स्वामींचे सेवेसी

सेवक **नारोबा नाईक रत्नपारखी** कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत गेलें पाहिजे. यानंतर आम्ही **वाईस** आलों होतों तेव्हां तुम्ही कामकाजाचा मजकूर आम्हासी बोलिला जे, कांहीं कार्यभाग करूं. तरी आम्हासी जें बोलिलां तो मजकूर खरा असेल तरी आम्हास लेहून पाठवणे. तुम्ही जें बोलिलां त्याप्रमाणें तुमचा मजकूर करून देऊं. मग तुम्हापासून कार्यभाग करून घेऊं. कार्याचा मजकूर कोठपावेतो होईल तो लेहून पाठवणें. तुमचे उत्तर आल्यासारिखे कोण्हास पाठऊन देऊं. बहुत काये लिहिणें उत्तर लौकर पाठविलें पाहिजे. कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

Naroba Naik Ratnaparkhi requests Vishwanath Bhat to pay him money as settled at Wai.

---

No. 17 ] श्रीभवानीशकर १६६१ / १७३९

राजश्री **बालंभट बावा** स्वामींचे सेवेसी

सेवक **नारोबा नाईक रत्नपारखी** सा। नमस्कार विनंती उपरी आपणास पत्र पाठविलें याचे उत्तर निराकरण केलें तरी अनमान कोणता ? गाहाण असतां अनमान काय? तरी तुमचा व आमचा पडदा फिटला म्हणून आणखी **कृष्णाजी नाईक** पाठविले आहेत. तरी हरप्रेत्न करून कार्य केलें पाहिजे. अनमान सहसा न कीजे. कितेक वर्तमान **कृष्णाजी नाईक** सांगतां विदित होईल. बहुत काये लिहिणें: कृपा असों दीजे हे विनंती.

Naroba Naik Ratnaparkhi requests Balambhat Vaidya to pay him money with Krishnaji Naik.

---

No. 18 ] पौष शु. १२।१६६९ / डिसेंबर ३०।१७३९

उचापती गु॥ **सतापा मारुलकर** सु॥ आर्बैन मया आलफ पौष मास सवाल (या यादींत घेतलेल्या सामानाचें तारीखवार कोष्टक दिलें आहे, त्यावरून **वैद्यांचे** मुक्काम

कोठें व कोणत्या दिवशीं होते, तेवढ्या पुरती माहिती खालीं दिली आहे )

पौष शु. १२ रविवार—**खेडबावसी**

" व. १ गुरुवार—**डेऱ्यास**

" व. ३ शनिवार—**मेढें**

" व. ४ रविवार—**केळघर**

In this, are given the haults of Vaidyas, found in a yadi of the Shop keeper, named Satappa Marulkar, of articles bought from him in the Month of Poush.

---

*No. 19* ] श्री **माघ शु. १०।१६६१**
जाने. २७।१७४०

राजश्री **विस्वनाथभट वईद्य** स्वामी गोसावी यासि.

सेवक **रामाजी नाईक वाकडे** नमस्कार. विनंती उपरी. आमचे यैवजीं **सौ मातुश्री राधाबाई** यास रुपये २५७५॥ पच्यवीसशे साडे पच्याहातर देणें. मिती माघ सुध १०

Ramaji Naik Wakade's letter to Vishwanath Bhat to pay Rs. 2575-8 to Soubhagyawati Radhabai.

---

*No. 20* ] **माघ व. १२।१६६१ बुधवार**
फेब्रु. १३।१७४०

( पहिला बंद नाहीं )

२

ही पारपत्य सत्वरच होईल बहुतेक तों जालेंच आहे. यानंतर **राजपुरीवाला** याचाही वकील श्रीमंताकडे **नगरास** गेला जे, आपणास कांहीं सरंजाम चालीस हजार पावेतो घ्यावा, वगैरे कांहीं आडी आहेत त्या कबूल कराव्या, म्हणजे **जंजिरा** देतों यैसें बाजारी वर्तमान आहे. तहकिकांत नाहीं. तहकीक कागदच आले असेत. वरकड सर्व यथास्थित असे. अधिकोत्तर ल्याहावे यैसें नाहीं. यैवज पोत्यास येणेप्रा भरला. आधीं **रायानी** येक सा ८= सिरस्ता प्रो व्याज देऊं, पुरवेल तरी यैवज भरणें, नाहींतर आम्ही घेत नाहीं. त्याप्रों कबूल करून भरणा चालीस लाविला.

२४००० माघ वा १० सोमवारीं
२६००० माघ वा ११ मंगळवारीं
५००००

येकूण पन्नास हजार आम्ही भरिले. बाकी भरणा राहिला, तो **माहादोबा नाईक दामले** यांजकडील पंचवीस पो काल मंगळवारीं सा हजार आले आहेत. बाकी आज उद्यां आले म्हणजे पुरऊन देवितों. पंचवीस **वलभ सुंदर** याजवर चिटी पा, तो यैवज माघ वद्य १३ गुरुवारीं उदैक देतो म्हणोन कबूल केलें आहे. ते घेऊन देतों. **घाणेकर** यांची चिटी किती रुा करावयाची, तें रुा लेहून पाठवावें. नवा रोजाचे मुदतीची चिटी करणें. कळावें. **माहादोबा नाईक** यांस पंचविसाची चिटी, जे भरणा करून देणें म्हणोन पाठऊन द्यावी. कळलें पाहिजे. बहुत काये लिहिणें कृपा लोभ असो दीजे. व्याजाची परवानगी घेऊन हिसेब करविला. रुा १४१७९ चौदा हजार येकसे येकुण्यासी जाले आहेत. ते या भरणेयांत देतात किंवा काय करितात, हा जाबसाल अद्याप उगवला नाहीं. आज उगवून घेतों. कळावें. तुम्ही हिसेब केला तो चुकला आहे येक मिती. लाख रुा व्याजती धरीली, ते मिती जाली. कसराजिकडे पौर्णिमाच लागू सरकारांतून जाली.

Money was advanced to Peshwa Bajirao who agreed to pay interest at one Re two annas per cent per mensem.

*No. 21* ] माघ व. २ ते फा. शु. २।१६६१
फेब्रु. ३ ते १८।१७४०

बाळंभटांच्या खाजगत खर्चाच्या टिपणावरून त्यांचे मुकाम खालीं दिले आहेत.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रविवार | छ १५ | जिल्काद | माघ वद्य | २, | फेब्रु | ३।१७४० | | जेजूरी |
| सोमवार | ,, १६ | ,, | ,, | ३, | ,, | ४ | ,, | ,, |
| मंगळवार | ,, १७ | ,, | ,, | ४, | ,, | ५ | ,, | सासवड येथें |
| बुधवार | ,, १८ | ,, | ,, | ५, | ,, | ६ | ,, | सोपानकाकांचे उत्सवास मुक्काम |
| बुधवार | ,, २५ | ,, | ,, | १२, | ,, | १३ | ,, | |
| मंगलवार | ,, २ | जिल्हेज | फा. शु. | ४, | ,, | १९ | ,, | कपडे |
| बुधवार | ,, ३ | ,, | ,, ,, | ५, | ,, | २० | ,, | शिवापूर |
| गुरुवार | ,, ४ | ,, | ,, ,, | ६, | ,, | २१ | ,, | ,, |
| शुक्रवार | ,, ५ | ,, | ,, ,, | ७, | ,, | २२ | ,, | शिरवळ |
| शनिवार | ,, ६ | ,, | ,, ,, | ८, | ,, | २३ | ,, | वेळें |
| रविवार | ,, ७ | ,, | ,, ,, | ९, | ,, | २४ | ,, | भोइंज |
| सोमवार | ,, ८ | ,, | ,, ,, | १०, | ,, | २५ | ,, | लिंब |
| मंगलवार | ,, ९ | ,, | ,, ,, | ११, | ,, | २६ | ,, | ,, |

These are the haults of Balambhat extracted from daily accounts.

